# रक्ताचीं

# फुलें

लेखक : अनंत काणेकर



स्वस्त-पुस्तक-योजना : ८ :

ग. पां. परचुरे
प्रकाशन मन्दिर
मुंबअी ४

मूल्य अेक रुपया

## अनुक्रमणिका






प्रथमावृत्ति : १ ऑक्टोबर १९५९

मुद्रक : वि. पु. भागवत, मौज प्रिंटिंग ब्यूरो, खटाववाडी, मुंबआी ४

प्रकाशक : वि. ग. परचुरे, ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, गोरेगांवकर चाळ क्र. २, गिरगांव, मुंबआी ४

—१९५६ च्या जून-जुलै महिन्यात भारत सरकारनें चौदा भाषांतले पत्रकार आणि लेखक यांना पंजाब, पेप्सु, पतियाळा, हिमाचल युक्तप्रांत इत्यादि प्रदेशांतल्या नद्यांच्या योजना, समाज विकास प्रकल्प, निर्वासितांची नवी गावें वगैरे दाखविण्याकरितां खास दौऱ्यावर नेलें होतें. त्या दौऱ्यांत जें पाहिलें त्यासंबंधीचे 'रक्ताची फुलें' या पुस्तकांत पांच लेख आहेत. हें सर्व पहाण्याची संधि दिल्याबद्दल भारत सरकार, त्यांचे माहितीखात्याचे प्रमुख, आणि आम्हां लेखकांच्या सर्व सुखसोयींची अत्यंत तत्परतेनें व्यवस्था ठेवणारे पंजाब, हिमाचल, पेप्सु, युक्तप्रांत या प्रदेशसरकाराचे संपर्काधिकारी यांचा मी अत्यंत आभारी आहें. हे लेख प्रसिद्ध करणाऱ्या नियतकालिकाचें ऋणहि मान्य करतों.

या पांच लेखांखेरीज 'कोयनेचें पाणी' हा लेख आणि वॉयनोन्स्की या अर्थशास्त्रज्ञाची काल्पनिक मुलाखत या पुस्तकात आहेत. ही मुलाखत माझ्या 'बोलका ढलपा' पुस्तकात आधीच आलेली आहे; पण ज्या समाजविकास योजनांचे बरेंचसें वर्णन या पुस्तकांत आलें आहे त्यांचा अन्वयार्थ लावायला एका तज्ज्ञाचे या संबंधीचे विचार फार उपयुक्त होतील म्हणून हा लेख इथे पुन्हा छापला आहे सतलज, चिनाब, बियास, रावीच्या पाण्याबरोबर आपल्या कोयनेचेंहि थोडें पाणी दाखवावें म्हणून कोयनेसंबंधीचा लेख घेतला.—

मुंबई,
२४-९-१९५९

**अनंत काणेकर**

# रक्ताचीं फुलें

## चंडीगड

फाळणीच्या जखमांनीं पंजाब रक्तबंबाळ झाला होता. त्या रक्ताचीं फुलें करण्याचा निर्धार भारतीय पंजाबनें केला. या निर्धाराचें प्रतीक म्हणजे हळूहळू आकार घेत असलेली पंजाबची नवी राजधानी 'चंडीगड.' हिमालयाच्या छायेंत असलेल्या एका उघड्या जागेत पंजाब आपली नवी कोरी राजधानी उभी करीत आहे.

आपल्या नवनवीन कल्पनांनीं जगाला थक्क करून टाकणारे फ्रेंच नगर रचना तज्ज्ञ मॉ. कॉर्बुसिये यांनीं या राजधानीचा आराखडा तयार केला. या नगरीचे रस्ते, इमारती, बागा, बाजार सर्वच कांहीं इतकें जगावेगळें आहे कीं नवकाव्य किंवा नवचित्र कलेप्रमाणेंच या नववास्तुकलेसंबंधीहि जोराचा वाद माजला आहे. भारतसरकारच्या माहितीखात्यानें पंजाब, पतियाळा वगैरे प्रदेशांतली विकासकार्यें दाखविण्याकरितां पत्रकारांना न्यायचें ठरविल्यामुळें चंडीगड पहाण्याची संधि लाभली. भाक्रा—नंगलची धरणें पाहिल्यानंतर रात्रीं साडेनऊच्या सुमारास आम्ही नंगल स्टेशन सोडलें. पहांटे साडेपांचला चंडीगड स्टेशन आलें. नव्या राजधानीचें छोटेंसें स्टेशनहि अगदीं नवें—अगदीं नवें कोरें आहे. राजधानीचें स्टेशन इतकें लहान कसें म्हणून पंजाबसरकारच्या संपर्काधिकाऱ्यांना आम्हीं विचारलें तेव्हां ते म्हणाले, 'अलीकडेच हायकोर्ट, विधानसभा वगैरे चंडीगडला आलीं आहेत. आत्तां कुठं वस्ती वाढते आहे. मंत्र्यांचे बंगलेहि नुकतेच बांधून झाले आहेत. आतां आपण शहराकडे जायला निघूं तेव्हां आजूबाजूला तुम्हांला मोकळी जागा पसरलेली दिसेल. स्टेशनापासून शहरापर्यंत

या जागेंत नवे उद्योगधंदे सुरू व्हावयाचे आहेत. हें सर्व कांहीं झालं म्हणजे स्टेशन वाढवावंच लागेल.'

जीप गाड्यांतून निघालों तेव्हां खरोखरच बराच वेळ आजूबाजूला उघडा माळच दिसत होता. चंडीगडमधल्या भपकेदार 'माऊंट व्ह्यू' हॉटेलमध्यें आमच्या प्रातरुपाहाराची सोय केली होती. या हॉटेलची इमारतहि कॉर्बुसियेच्या कल्पनेनुसार बांधलेली दिसली. निळ्या रंगाची, भूमितींतल्या आकृतीसारखी वाटली. नांवाप्रमाणें हॉटेलच्या सज्जांतून दूर पहातांना डोंगर दिसत होते खरे. चंडीगडपासून सिमला फार दूर नाही. अंबाला—काल्का रेल्वेमार्गावरच चंडीगड आहे. चंडीचें देवालय असलेलें एक खेडें इथें पूर्वीपासून होतेंच म्हणतात.

उपाहार आटोपल्यावर संपर्काधिकाऱ्याबरोबर शहर पहावयाला जीप गाड्यांतून आम्ही बाहेर पडलों. पहिल्यांदा हायकोर्टाची इमारत पाहिली. अजून ती पुरी व्हायची आहे. पण कोर्टाचीं कामें सुरू झालीं आहेत. निळे, पिवळे, लाल उभे चौकोन, मधूनच एखाद्या भिंतीचा आडवा चौकोन असे या इमारतीचे चमत्कारिक विशेष पाहून नववास्तुकलेला काय म्हणावें याचा विचार करीत होतों, इतक्यांत कुणी तरी म्हणालें, 'गंभीर प्रकृतीचे हायकोर्ट जज्ज पहिल्यांदा या इमारतीजवळ आले तेव्हां मोटारी वळवून त्यांना पळून जावेसें वाटलें म्हणतात!'

नंतर सचिवालयाची नऊ मजली तयार होत असलेली इमारत पाहिली. एखाद्या जनावराला जाडजूड शेंपूट असावें, त्याप्रमाणें या नऊ मजली इमारतीला मागल्या बाजूला पिसाच्या कलत्या मनोऱ्यासारखें कांहींतरी जोडलेलें आहे. याला 'रॅम्प' म्हणतात. या रॅम्पमध्यें लंडनच्या भुयारी रेल्वेच्या स्टेशनांत आहेत तसे वरखाली घसरत जाणारे जिने किंवा 'एस्केलेटर्स' बसवणार आहेत असें कळलें. वरखालीं जाणाऱ्यायेणाऱ्यांची वर्दळ मुख्य इमारतीला जोडलेल्या या वेगळ्याच भागांतून झाल्यामुळें नऊ मजल्यावर चालू असलेल्या सरकारी कामाला तिचा त्रास होणार नाहीं अशी कल्पना असावी. इथली एक कल्पना मला फार आवडली. या इमारतीचें बांधकाम चालू होतें आणि उकरलेल्या मातीचे टेकाडासारखे ढीग कांहीं अंतरावर पडले होते. ही टेकाडें इथेंच नव्हे तर ठिकठिकाणीं तुम्हांला दिसतील. एक अधिकारी म्हणाला, 'कॉबुसियेंची अशी कल्पना आहे कीं या टेकाडांवर झाडें लावायचीं, म्हणजे शहरांतली सर्वत्र सपाट

दिसणारी जमीन डोळ्यांना त्रासदायक होते ती तशी होणार होणार नाहीं; आणि मधूनमधून या हिरव्या टेकड्या डोळ्यांना आल्हाद देतील!'

एका रस्त्यावर लाल विटांचें आणि दरवाजावर चमत्कारिक कमानी असलेले कांहीं बंगले रांगेनें दिसले. हे मंत्र्यांचे बंगले. कॉर्बुसियेच्या कृतींचा एक विशेष म्हणजे--भारतांत ऊन फार कडक, तेव्हां मोठमोठ्या इमारतींच्या बाहेरच्या बाजूला पत्त्यांच्या बंगल्यासारखे खालपासून वरपर्यंत सिमेंटाच्या आडव्या उभ्या फळ्यांचे चौकोन किंवा 'सन् ब्रेकर्स' लावणें. चंडीगडमध्यें अशा इमारती आहेतच. शेवटीं कॉर्बुसियेच्या हाताखालीं काम करणाऱ्या वास्तुशास्त्र विशारदांच्या कचेरींत गेलो. कॉर्बुसिये आतां फक्त वर्षातून दोनदां फ्रान्सहून इथें येतात. सर्व कामें त्यांचे दुय्यम अधिकारी करीत असतात. श्री. लंबा नांवाच्या एका तरुण पंजाबी अधिकाऱ्यानीं आम्हांला सर्व नकाशे दाखवले, आणि कामाची माहिती दिली. एका भिंतीवर एक मोठा थोरला हिरवा, पिवळा, निळा, लाल चंडीगडचा रंगीत नकाशा लावलेला होता. शहराचे तेवीस 'सेक्टर' किंवा विभाग केले आहेत. प्रत्येक विभाग बाजार, शाळा वगैरे सोयींनीं स्वयंपूर्ण असेल. कोणत्याहि घरापासून शाळा पांच मिनिटांपेक्षां अधिक अंतरावर नाही. रस्त्याच्या बाजूला येणाऱ्या घरांच्या भागासमोर विटांच्या लांबच लांब भिंती असल्यामुळें धूळ घरांत येणार नाहीं. रस्ते व्ही १, व्ही २, व्ही ३, असे तीन प्रकारचे असतील. पादचाऱ्यांसाठीं असलेला रस्ता उंचावरून जाईल आणि जलद वेगाच्या वाहनाचा रस्ता खालच्या पातळीवर असेल; त्यामुळें पादचाऱ्यांना वाहनांचा त्रास होणार नाहीं आणि अपघातहि टळतील. शहरांत ठिकठिकाणीं हिरवीं टेकाडें असतील. त्याचप्रमाणें शहराच्या मधूनच एक 'ग्रीन्‌बेल्ट' किंवा हिरवा पट्टा असेल. या पट्ट्यांत झाडेंझुडुपें, झरे, उपवनें असल्यामुळें गर्दीच्या औद्योगिक शहराला येणारा भकासपणा एकदम कमी होईल, आणि या पट्ट्यांतून फिरणाराला आपण शहरांत नसून रम्य खेड्यांतच फिरतों आहोंत, असें वाटेल.

मोठमोठ्या इमारतींचा एक 'मॉन्युमेंटल' किंवा 'भव्य' विभाग शहरांत असेल. इथें शहराच्या बड्या कारभाऱ्यांच्या कचेऱ्या, स्मारकमंदिरें, पुतळे वगैरे असतील. सांस्कृतिक विभाग शहरापासून जरा दूर आहे. तिथें विद्यापीठ, कलाप्रदर्शनांच्या इमारती वगैरे ठेवण्याची कॉर्बुसियेची कल्पना आहे. 'काय हो', आम्ही लंबांना विचारलें, 'हायकोर्टांत ते हिरवे, पिवळे, लाल चौकोन मध्येंच

कांहीं भिंतींना दिसतात ते कशाकरतां?' लंबा म्हणाले, 'त्याचं असं आहे— कॉर्बुसियेच्या मतं इमारतींत केवळ उपयुक्ततेचें तत्त्व नसावें. विशिष्ट कामाला ती उपयुक्त असावीच; पण माणसाला सौंदर्यदृष्टि असते, तिचेंहि इमारतीनें समाधान करायला हवें. या हिरव्यापिवळ्या चौकोनांच्या पार्श्वभूमीवर कांहीं शिल्पकृती उभ्या करायच्या आहेत. न्यायदानाचें रुक्ष, गंभीर काम चालतें तिथें मधूनमधून रंगीबेरंगी सौंदर्यछटा दिसल्या तर कांहीं वाईट नाही!'

## *पतियाळा*

पंजाबची फाळणी झाली आणि लक्षावधि हिंदू—शीख स्त्रीपुरुष मुलांचे लोंढे पश्चिम पंजाबांतून भारताच्या पूर्वपंजाबकडे आणि पतियाळा वगैरे पंजाबी संस्थानांकडे लोटले. या निर्वासितांना अन्न, वस्त्र, घरें देण्याची जबाबदारी पंजाब, पेप्सु आणि भारत सरकारांवर होती. एकट्या पतियाळामध्येंच पहिला पंचवीस हजार निर्वासितांचा लोंढा आला. दुसरा आणखी पंचवीस हजारांचा आला. नतर भावलपूर या पाकिस्तानी संस्थानांतून चाळीस हजार निर्वासित आले. पतियाळा आणि पूर्वपंजाबांतील इतर संस्थानें मिळून पतियाळा महाराजांच्या राजप्रमुखत्वाखालीं नवा पेप्सु प्रदेश अस्तित्वांत आला होता. जंगली जनावरें आणि खुनी दरोडेखोर यांनीं बुजबुजलेली जंगलें तोडून गहूंहरभऱ्याचें सोन्यासारखें पीक देणारी नवी शेतजमीन निर्माण करण्याचा निश्चय पेप्सु सरकारनें केला. भाक्रानंगल धरणांनीं अडवलेल्या सतलजचें पाणी नव्या कालव्यांतून वहात येऊन या नव्या भूमीला 'सुजला, सुफला सस्यश्यामला' करतें. हें सर्व पहाण्याकरितां आम्ही पतियाळाला आलों होतों. सकाळीं सातला पतियाळा स्टेशन आलें. पूर्वीच्या एका मोठ्या संस्थानाची राजधानी असल्यामुळें स्टेशन भव्य आहे. पतियाळांतले रस्ते आणि इमारतीहि ऐसपैस आणि भव्य वाटल्या. एका जुन्या राजवाड्याचें गेस्टहाऊस केलें आहे. भिंतीवर मोठमोठीं रंगीत चित्रं लावलेल्या आणि छतांतून मोठमोठे झुंबर लोंबत असलेल्या एका दालनांत प्रातरुपाहार करून पेप्सु सरकारच्या संपर्काधिकाऱ्यांबरोबर आम्ही पत्रकार बाहेर पडलों.

भाक्रा-नंगल कालव्याला समांतर असलेल्या नवीन रस्त्यानें आमच्या मोटारी चालल्या होत्या. वाटेंत एके ठिकाणीं घग्गर नदी लागली. लहानशीच नदी आहे.

कालव्याला नदी आडवी आल्यामुळें नदीचें पाणी कालव्याखालून पुढें जाऊं दिलें आहे. पाऊस पडल्यामुळें नदीचें पाणी गढूळ, तांबडें लाल झालें होतें, तर कालव्याचें पाणी स्वच्छ स्फटिकासारखें होतें. शुभ्र प्रवाहाखालून जाणारा तांबड्या पाण्याचा प्रवाह पाहून गंमत वाटली. दोन कंपन्यांना जंगलें तोडून शेतजमीन तयार करण्याचीं कंत्राटें देण्यांत आलीं आहेत. एका कंपनीनें पन्नास हजार एकर जमीन करायची आणि दुसरीनें पन्नास हजार. चाळीस मैलांचा प्रवास करून आम्ही कंपनीच्या छावणींत येऊन पोहोचलों. छावणी मी मुद्दाम म्हणतों. उघड्या माळावर तंबू उभे करून कंपनीनें आपल्या कचेऱ्या, वर्कशॉप, वगैरे तयार केलीं आहेत. कचेरींत थंड पेयें घेऊन जंगलतोडीचें काम पाहायला जीप गाड्यांतून बाहेर पडलों. दोन दिवस आधीं पाऊस पडल्यामुळें चिखल झाला होता. या चिखलाच्या डबक्यांतून आणि खडकाळ खाचखळग्यांतून आम्हांला पंधरा मैल जायचें होतें. जीप गाड्याच हें धाडस करूं शकतात. जंगलांत काम चाललें होतें तिथें येऊन पोहोचलों. तेव्हां धडाधडा धडाधडा करीत फिरणारे दोन दोन हत्तीं-पेक्षां मोठे बुल डोझर पाहून चकित झालों. दोन हातांत मावणार नाही इतक्या जाड लांब साखळदंडाचें एक टोक एका बुलडोझरला बांधलें होतें; दूर अंतरावर असलेल्या दुसऱ्या बुलडोझरला दुसरें टोक बांधलें होतें. दोन्ही टोकांचे बुलडोझर धडाधडा करीत पुढें जाऊं लागले कीं साखळदंडाच्या आवाक्यांत आलेलीं मोठ-मोठीं झाडें, झुडुपें, टेकाडें हां हां म्हणता डोळ्यांसमोर उन्मळून पडतात आणि साखळदंडाबरोबर फरफटत पुढें ओढलीं जातात. मध्येंच कुठें फार मोठा ढीग झाला आणि साखळदंड अडलाच तर तिसरा बुलडोझर मध्यें असतो तो ढुश्शी मारणाऱ्या बैलासारखा त्या ढिगाला पुढें ढकलीत असतो! जंगलांचे मोठमोठे भाग दहाबारा मिनिटांत आमच्या डोळ्यासमोर नाहींसे होऊन सपाट जमीन तयार होत होती.

तिथून अर्नो नांवाच्या खेड्याजवळ असलेल्या जंगलाच्या दुसऱ्या एका भागांत गेलों. इथें बुल डोझरांनीं सपाट केलेल्या जमिनींतलीं झाडांचीं मुळें, दगड–धोंडे वगैरे यंत्रांनींच बाहेर काढून गोळा केलीं जात होतीं. साफ झालेल्या जमिनीवर मोठमोठे ट्रॅक्टर फिरत होते, आणि नांगरून तिला भुसभुशीत करीत होते. हिंदूशीख निर्वासितांची पाकिस्तानांत जितकी जमीन गेली, त्या मानानें इथून पाकिस्तानांत पळालेल्या मुसलमानांची जमीन बरीच कमी आहे. पाकि-

स्तानांत गेलेल्या जमिनीच्या साधारणपणें एकदशांश जमीन सध्यां निर्वासितांना द्यायचं पेप्सु सरकारनें ठरविलें आहे. जवळच्च असलेलें अर्नो खेडें पहायला आम्ही गेलों. दहाबारा पडकीं घरें आणि एक विहीर दिसली. एका एकमजली पडक्या घरांत जंगल साफ करणाऱ्या कंपनीचे कांहीं मजूर जेवण शिजवीत होते. जवळच्च एक पडकी मशीद दिसली. 'हें मुसलमानांचें खेडें होतें कीं काय,' आम्ही विचारलें. 'ते सर्व पळून गेल्यामुळें तर असें ओसाड झालें नाहीं ना?'

'कांहीं कल्पना नाहीं,' आमच्याबरोबर असलेले एक शीख इंजिनियर म्हणाले, 'या भागांत एके काळीं दरोडेखोरांचा सुळसुळाट होता. कांहीं खेडीं लोक पळून गेल्यामुळें ओसाड झालीं आहेत. माझेच पहाना,–मी पाकिस्तानांतून आलेला निर्वासित आहें. इथलीच थोडी जमीन सरकारनें मला दिली आहे. पण कालच मी इथं येऊन ती जमीन पहिल्यांदा पाहिली !'

कंपनीच्या कचेरींत दुपारीं दीडच्या सुमाराला परत आलों, आणि तिथून या जंगल विभागांतल्या सरकारी डाक बंगल्यांत जेवायला गेलों. बरोबरचे अधिकारी म्हणाले, 'या बंगल्याला मोठा इतिहास आहे. एकदोन वर्षांपूर्वी या बंगल्याच्या वाटेला कुणी जात नसे !'

'कां?' आम्ही विचारलें.

जग्गा नांवाच्या दरोडेखोराचें या भागात राज्य होतें म्हणा ना ! रात्रीं अपरात्रीं जग्गा इथें यायचा आणि इथल्या नोकरांना जेवण करायला सांगायचा. जिवाच्या भीतीनें ते बिचारे करायचे सर्व कांही. खुशाल विश्रांति घेऊन सकाळीं जग्गा निघून जायचा ! आतां जंगलाबरोबर दरोडेखोरांचाहि निःपात झालाय् !

### *अमृतसर*

शीखांच्या पवित्र सुवर्णमंदिरामुळें पंजाबांतलें अमृतसर शहर प्रख्यात आहे; पण आतां सरकारच्या उत्तेजनानें निर्वासित हिंदूशीखांनीं लहानमोठे अनेक नवे उद्योगधंदे अमृतसरमध्यें आणि अमृतसरच्या आसपास सुरू केल्यामुळें तें अधिक प्रख्यात होते आहे. गालिचे तयार करणारा एक भव्य कारखाना आम्हीं पहावयाला गेलों. वाफेच्या प्रचंड यंत्रावर कारखाना चालतो. साध्या घोंगडीपासून तों सुंदर रंगीबेरंगी गरम पांघरुणांपर्यंत अनेक प्रकारचा माल इथें तयार होतो. पुरुषांच्या सुटाचें हरतऱ्हेचें सुंदरसुंदर काश्मिरी कापडहि होतें. गालिचे मात्र

एका शांत, झोपडीवजा जागेंत हातांनीं विणले जातात. सतराअठरा वर्षांचीं निर्वासित मुलें रंगीबेरंगी लोंकर घेऊन हे गालिचे निरनिराळ्या मागांवर विणीत बसलेलीं दिसलीं. विशिष्ट आकृति गालिचावर उतरण्याकरितां कोणत्या रंगाची लोंकर कोणत्या वेळीं वापरावयाची हें समजण्याकरितां एक मजेदार युक्ति योजलेली आढळली. निरनिराळ्या रंगाच्या लोकरींचीं नांवें असलेलें एक गाणें एक मुलगा म्हणत असतो, आणि त्या गाण्याच्या ओळी त्याच्याबरोबर म्हणत ती ती लोंकर इतर मुलें हातांत घेत असतात. गाण्यामुळें श्रमहि हलके होतात आणि आकृतीहि बरोबर उठते.

आयते शर्ट किंवा गंजीफ्रॉक मिळतात, त्यावर कंपनीचें नांव किंवा ट्रेडमार्कची खूण रंगीबेरंगी रेशमानें भरलेली लहानशी पट्टी गळ्याकडे असते. असलीं लेबलें हव्या त्या अक्षरांसह किंवा चित्रांसह एका यंत्रावर भराभर तयार होतात. हीं लेबलें करण्याचा एक मोठा कारखाना अमृतसरमध्यें आहे. याच कारखान्यांत तलम पांढऱ्या कापडावर कशिद्यासारखीं फुलें भरून बायका ज्याला 'चिकन्' कापड म्हणतात तें कापड तयार करण्याचें प्रचंड जर्मन यंत्र आहे. साऱ्या आशियाखंडांत याच कारखान्यांत हें यंत्र आहे म्हणतात. कशिद्याची हवी ती आकृति आपोआप कपड्यावर करणारीं, अनेक प्रकारें उभीं, आडवीं, गोल फिरणारीं लहानमोठीं चक्रें असलेल्या या अवाढव्य यंत्रांतून सुंदर आकृत्यांनीं भरलेले तागेच्या तागे दिवसाकांठीं बाहेर पडत असतात. या अवाढव्य यंत्रावर हव्या त्या आकृत्यांच्या पट्ट्या बसवून देखरेख करायला फक्त एकदोन माणसें लागतात. सर्व काम यंत्र व्यवस्थित करीत असतें.

एका छोट्याशा बंगल्यांत थर्मामीटर करण्याचा कारखाना जपानी तज्ज्ञांच्या साहाय्यानें कुणी तरी चालवला आहे. रोज साडेपांचशें थर्मामिटरें इथें तयार होतात. मुलांच्या तीनचाकी गाड्या आणि विजेचे पंखे करणाऱ्या एका कारखान्यांतून रोज पस्तीस गाड्या आणि आठ पंखे बाहेर पडतात. दुसऱ्या एका नव्या कोऱ्या कारखान्यांत सुंदर शिवण्याची यंत्रें तयार होत असलेलीं दिसलीं. या शिवण्याच्या यंत्राचे एकशेंतीन भाग असतात. त्यांपैकीं आम्ही त्र्याण्णव इथें तयार करतों, फक्त दहा परदेशांतून आणतां, असें तिथले इंजिनियर म्हणाले. सोन्याच्या मण्यांसारखे दिसणारे लहानमोठे, निरनिराळ्या आकारांचे कांचेचे मणी तयार करणारा एक कारखाना आहे. भट्टींतून मण्यांच्या

माळेची एक कांडीच्या कांडी बाहेर पडते. ती तोडून सुटे मणी करायचे आणि मग त्यांना सोनेरी रंग द्यायचा. मण्यांच्या माळा रेशमी धाग्यांत ओवून त्यांच्या पेडी करायच्या, आणि कागदाच्या डब्यात भरून बाजारांत पाठवायच्या. उत्तर प्रदेशांतल्या खेडुत बायकांत या मण्यांच्या फार खप आहे असें कळलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शीखांचे सुवर्णमंदिर आणि शीखाची बरोबरी करण्याकरतां हिंदूंनीं बांधलेलें 'दुर्ग्याना मंदिर' पहायला गेलो. जुनें दुर्गामंदिर बाजूलाच आहे. जवळच पांढऱ्या शुभ्र संगमरवरी दगडाचें भव्य लक्ष्मीनारायण मंदिर बांधण्यात आलें आहे. मंदिराभोवती पांढऱ्या दगडांच्या फरशीचें मोठें थोरलें आवार आहे, आणि सभोवार सुवर्ण मंदिराप्रमाणेंच ऐसपैस तलाव आहे.

शीखाचें सुवर्णमंदिर पूर्वी मी एकदोनदां पाहिलेलें होतें; पण या खेपेला मंदिरांचे अधिकारी दाखवीत होते, त्यामुळें कांही नवें पहावयास मिळालें; आणि कांही नवी माहितीहि मिळाली. सोन्याच्या पत्र्यांनीं मढवलेले मंदिरांचे घुमट पूर्वी पाहिले होते. नक्षीकाम केलेल्या सोन्याच्या पत्र्यानीं मढवलेले चार भव्य दरवाजे अधिकाऱ्यानी दाखवले. उत्सवाच्या वेळीं चांदीचे दरवाजे काढून मंदिराला हे दरवाजे लावतात. महाराजा रणजितसिंगानीं दिलेले अनेक अलंकार इथें आहेत. एकशेंआठ टपोरे मोतीं आणि इतर रत्नें यांचा मुंडावळ्यांसारखा फेट्याला बांधायचा एक अलंकार होता.

ग्रंथसाहेब मंदिरांत आहे; आणि त्याचीच पूजाअर्चा होत असते. ग्रंथसाहेबांवर उत्सवप्रसंगीं लावण्याकरतां हिरे, मोती, पाचूमाणकांनीं भरलेली मखमली मसनद महाराजांनीं मंदिराला दिली होती. ती पूर्वी वापरीत. आता ती मौल्यवान वस्तू ठेवायच्या मंदिरांतल्या या खोलीत पहाण्याकरतां ठेवली आहे. बादशहा पांचवे जॉर्ज मंदिर पहायला आले तेव्हां कुणीतरी अधिकाऱ्यांनीं ती त्यांच्या बैठकीवर लावली. ग्रंथसाहेबांपेक्षां जगांत कांहींच मोठें नाही, तेव्हां मसनद त्या वेळेपासून आतां वापरली जात नाहीं!

मंदिराभोवतालच्या तलावाच्या काठानें फिरत असतां एका धर्मशाळेसारख्या दिसणाऱ्या जागेसमोर एक चबुत्रा पाहिला. एका शीख वीराचें रंगीत तैलचित्र तिथें बाजूला होतें. हा दीपसिंगाचा चबुत्रा. मुरारबाजीप्रमाणें शीर तुटलें तर दीपसिंगाचें धड दुधारी तलवारीनें कितीतरी वेळ शत्रूशीं झुंजत होतें असें शीखांचा इतिहास सांगतो. कोपऱ्यांतल्या एका इमारतींत शस्त्रांचा संग्रह होता.

तिथल्या माणसानें दीपसिंगाची दुधारी तलवार आम्हाला दाखविली. अनेक लहानमोठ्या तलवारी त्यानें दाखवल्या. त्यांत महाराजा रणजितसिंगाची तलवारहि होती. मंदिराच्या ऐसपैस आवाराच्या दुसऱ्या एका कोपऱ्यांत 'लंगर' होता. धर्मशाळेसारख्या दिसणाऱ्या या जागी अर्धी खोली भरेल एवढे प्रचंड टोप आणि थाळ्या होत्या. इथें रोज कित्येक मण डाळ उकडली जातें आणि शेकडो रोट्या भाजल्या जातात. शेंकडो गरीब दुपारच्या वेळीं 'लंगरां'तल्या पंक्तींत येऊन बसतात आणि एक रोटी खाऊन जातात. मुख्य मंदिरांतल्या ग्रंथसाहेबासमोर आज पेटी, तबला, एकतारीच्या साथींत भजन चाललें होतें. तरुण, वृद्ध शीख भजन म्हणत होते. शीख बायका, हिंदू स्त्रिया देवळांत करतात त्याचप्रमाणें पायरीवर डोकें ठेवून नाक घासून आंत जात होत्या. बाजूला एका प्रचंड भांड्यात सत्यनारायणाच्या प्रसादासारखा गरम गरम् शिऱ्याचा प्रसाद होता, तो जाणाऱ्यायेणाऱ्याला दिला जात होता. आम्ही प्रसाद घेतला आणि बाहेर पडलो.

## फिलौर

हडेलहप्पी पोलीस अधिकारी तयार करणाऱ्या संस्थेंत कविता किंवा नाटकाला स्थान आहे, हें सांगितलें तर कुणाला खरें वाटणार नाहीं. पण तें अगदीं खरें आहे. पंजाब सरकारचें फिलौर येथील पोलीस ट्रेनिंग स्कूल पहायला आम्ही गेलो तेव्हां तें आम्ही प्रत्यक्ष पाहिलें! सतलजनदीच्या काठावर फिलौरचा किल्ला आहे. हा किल्ला आणि हें गांव यांचा इतिहास फार जुना आहे. 'फूल' नांवाच्या एका जाट राजानें हें शहर वसविलें. तेव्हां त्याचें नांव 'फुलनगर' होतें. पुढें तें फिलौर झालें. जाटांकडून तें रजपुतांकडे आलें. दिल्लीहून लाहोरकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर तें असल्यामुळें शहाजहाननें तिथें एक मोठी थोरली सराई बांधली. मोगल साम्राज्य धुळीला मिळाल्यावर महाराज रणजितसिंहाकडे तें आलें. शीख-ब्रिटिशांच्या लढायांत ब्रिटिशांचा विजय होऊन शेवटीं त्यांनीं तें घेतलें. १८५७ च्या स्वातंत्र्य संग्रामांत इथल्या सैनिकांनीं बंड पुकारुन शहर ताब्यांत घेतलें, पण किल्ला इंग्रजांनीं शेवटपर्यंत सोडला नाहीं. या किल्ल्यांतच सध्यां पोलीस ट्रेनिंग स्कूल आहे. त्याशिवाय बोटांचे ठसे तपासण्याचा ब्यूरो, फायरआर्म्स ब्यूरो आणि गुन्हेगारांचे फोटो व इतर वस्तू

पारखायची प्रयोगशाळाहि इथेंच आहे. किल्ल्याच्या बाहेरच्या बाजूला नवीन वर्गासाठीं इमारती बांधल्या आहेत. हेड् कॉन्स्टेबल, सबइन्स्पेक्टर, खटले चालवणारे इन्स्पेक्टर, गॅझेटेड् पोलीस अधिकारी वगैरेंना इथें खास शिक्षण देण्यांत येतें.

सकाळींच चहा झाल्यावर घोडेस्वारांचे कसब आम्हांला दाखविण्यांत आलें. उंचसखल कुंपणांवरून फक्त एका हातांत लगाम धरून अनेक घोडेस्वारांनीं उड्या मारून दाखवल्या. त्यांच्या शिक्षकानें तर लगाम साफ सोडून देऊन दोन्ही हात छातीवर जोडून धरून नुसत्या पायाच्या इशाऱ्यानें धांवत्या घोड्याला कुंपणावरून उडी मारायला लावलें! मोठ्या थोरल्या परेड मैदानावर निरनिराळ्या प्रकारच्या कवायती चालल्या होत्या. प्रत्येक हुकूम कां व कसा द्यायचा हें उमेदवारांना शिक्षक समजावून देत होता. तिथून रिव्हॉल्व्हर प्रॅक्टीस चालली होती तिथें आम्ही गेलों. माणसाच्या उंचीचे लांकडी पुतळे रांगेनें उभे केले होते. दोऱ्या बांधून ते हालवले जात होते. धांवत्या माणसावर गोळी कशी झाडावी, आपल्या अंगावर धांवून येणाऱ्यावर कशी झाडावी वगैरे शिकवण्यांत येत होतें.

दारुगोळा ओढ्याच्या पलीकडे न्यायचा आहे, पूल नाही. दोन्ही कांठांवर बांबू पुरून त्यांना बांधलेल्या दोरखंडावरून सर्व सामान घेऊन पलीकडे जायचें आहे. तर तुम्ही सामान न भिजवतां कसे जाल? हा प्रश्न एके ठिकाणीं शिक्षकानें विद्यार्थ्यांपुढें ठेवला होता. दारूगोळ्याच्या जड पेट्या आणि दोन झाडांना बांधलेला दोरखंड समोर होता. अंगावरला गणवेष, बंदूक वगैरे संभाळून हें काम करावयाचें होतें. विद्यार्थ्यांच्या प्रत्येक गटानें आपलें डोकें चालवून हें काम करावयाचें होतें. विचार करून नवे मार्ग शोधून कसे काढावे याची कसोटी शिक्षक घेत होते. कुणी कमरेला जड पेटी बांधून दोरखंडावरून लोंबकळत पलीकडे जाण्याचा प्रयत्न केला.

एकानें पेटी उघडून आंतले दारूगोळ्यांचे कापडी पट्टे बाहेर काढले, आणि अंगावर घेऊन तो सहज पलीकडे गेला. 'हें पहा,' प्रिन्सिपॉल आम्हांला म्हणाले, 'बाकीचे लोक बंद पेटी जशीच्या तशी नेली पाहिजे असें उगाच समजत होते. पेटीला कुलूप नाहीं. मग ती जड पेटी झाडांवर चढवून दोरखंडाला लोंबकळत नेण्यापेक्षां यानें पेटी उघडून पट्टे नेले तसेंच नेणें बरोबर नाहीं का?'

दहा वाजतां निरनिराळे वर्ग चालू झाले, ते पहायला जाण्यापूर्वी खुल्या

नाट्यगृहांत एक नाटिका चालू होती तिथें जाऊन थोडा वेळ बसलों. ही नाटिका म्हणजेहि एक वर्गच होता! एका मोठ्या वटवृक्षाखाली बुंध्याकडे लांबरुंद चौकोनी पार बांधून या खुल्या नाट्यगृहांत रंगभूमि केली आहे. समोर अर्ध वर्तुळाकार एकावर एक पायऱ्यांच्या रांगा बांधून प्रेक्षकांना बसण्याची सोय केली आहे. गुन्हेगार वेड लागल्याचें सोंग करतो तेव्हां तें सोंग आहे कीं खरें वेड आहे हें कसें ओळखावयाचें हा नाटिकेचा विषय होता. वडाच्या पारावर एका कोपऱ्यांत खुर्च्या टेबलें ठेवून पोलीस स्टेशनांतली खोली केली होती. दुसऱ्या कोपऱ्यांत एक लाकडी पिंजरा होता. त्यांत दाढी वाढलेला चिंध्या पांघरलेला वेडा होता. तो वाटेल तसा ओरडत होता, लोळत होता, हंसत होता, रडत होता. तिथला पोलीस शिपाई पोलीस स्टेशनांत येऊन अधिकाऱ्याला त्या वेड्याची हकीगत सांगतो. अधिकारी पोलीस डॉक्टरांना घेऊन पिंजऱ्याकडे जातो. डॉक्टर वेड्याशीं बोलतो असा प्रसंग चालू होता. वेड्याचें काम करणारानें नक्कल फार छान वठवली. खोली स्वच्छ ठेवतो, लघ्वीला गेला तर आडोशाला बसतो, पोलीस जवळ असले कीं ज्यास्त आरडाओरड करतो, डॉक्टरनें वेडा आहे म्हटलें कीं आनंदित झालेला दिसतो, इत्यादि चिन्हांवरून हे वेड खरें नसून पांघरलेलें आहे, ही गोष्ट डॉक्टर पोलीस-अधिकाऱ्याच्या नजरेला आणतात.

एका खोलींत दरोडेखोरांच्या टोळीविरुद्ध कोर्टांत पुरावा कसा मांडावा हेंहि नाट्यपद्धतीनें दाखविलें जात होतें. शिक्षक मॅजिस्ट्रेट झाले होते. दरोडेखोरांची सोंगें घेऊन दोनचार विद्यार्थी आरोपी होते. घुंगट तोंडावर घेऊन खून झालेल्या माणसाच्या साक्षीदार म्हणून आलेल्या बायकोचें काम एक विद्यार्थी चांगलेंच करीत होता. आरोपीकडे बोट दाखवून यांना 'फांशी द्या!' 'फांशी द्या!' म्हणून तो रडत ओरडत होता आणि मॅजिस्ट्रेट त्याला गप्प बसवीत होते!

दुसऱ्या एका वर्गांत एक कविता वाचून दाखविली जात होती. खून झाला असतां तपास कसा करावा तें सर्व कवितेंत वर्णन केलें होतें! शेजारच्या खोलींत एक मरून पडलेला माणूस दाखवला होता. त्याच्या पायाच्या अंगठ्याला बांधलेली दोरी जवळ पडलेल्या बंदूकीच्या चापाला अडकवलेली होती. खोलीच्या दाराशीं पडलेल्या मातींत कुणाच्या तरी पावलांचे ठसे होते. ही खरोखर आत्महत्या आहे कीं खून करणारानें पोलिसांना चकविण्याकरतां चापाला आणि आंगठ्याला दोरी बांधून सर्व कांही मुद्दाम मांडून ठेवलें आहे, हें विद्यार्थ्यांनीं ओळखायचें.

अशा तऱ्हेनें ट्रेनिंग स्कूलच्या सर्व वर्गांत या नव्या पद्धतीनें शिक्षण देण्यांत येतें.

स्कूलच्या वस्तुसंग्रहालयांत वल्लभभाई पटेलांच्या पावलाचा प्लास्टरमधला ठसा होता. भगतसिंगाला फांशीची शिक्षा फर्मावल्यावर न्यायाधिशानें टोक मोडून खालीं ठेवलेला टांकहि इथें जपून ठेवला आहे. गुन्हेगार वेगवेगळ्या प्रकारचीं शस्त्रें वापरतात; त्यांचे अनेक नमुने पहावयाला मिळाले. एक पानवाला पानपट्टी विकतांना एक पेटीसारखी चौकोनी ढकलगाडी वापरीत असे. पोरें पळविण्याकरतां तो या गाडीचा उपयोग करी! त्याला शिक्षा झाल्यावर पोलिसांनीं ती गाडी इथें आणून ठेवली आहे. आम्हाला ती गाडी प्रिन्सिपॉल दाखवीत असता तिचें दार उघडून दोन मुलें खरोखरच रडत बाहेर आलीं! आम्हाला गंमत दाखविण्याकरता त्याना शिकवून मुद्दाम आधींच तिथें बसविण्यांत आलें होते. एक मोठी थोरली साधीच पेटी तिथें दिसली. कसली म्हणून विचारतां रेल्वेच्या ब्रेकव्हॅनमध्यें चोरी करण्याकरतां चोर असली पेटी वापरतात, असें कळलें. या पेटींत एक चोर बसतो. बाहेर कुलूप असलें तरी ती दुसरीकडून उघडतां येते. ही पेटी इतर सामानाप्रमाणें त्याचे साथीदार ब्रेकव्हॅनमध्यें ठेवतात. गाडी चालू झाली कीं तो चोर बाहेर येऊन ब्रेकमधलें इतर सामान चोरून आंत पेटींत घेतो व पुन्हां बंद करून बसतो. दुसऱ्या स्टेशनवर त्याचे साथीदार राजरोसपणें कागदपत्र दाखवून ती पेटी उतरवून घेतात!

'फिंगरप्रिंट ब्यूरो'मध्यें हजारो गुन्हेगारांच्या बोटाचे ठसे व्यवस्थितपणें ठेवलेले आहेत. माणसानें आपलें रूप कितीहि बदललें तरी या ठशावरून त्याला ओळखतां येतें. ठसा फोटोंत वाढवून त्यांचा अभ्यास करतां येतो. गांधीजींच्या छातींत घुसलेल्या गोळीचाहि मोटा केलेला फोटो इथें पाहिला.

संध्याकाळीं अश्रुधुराचें प्रात्यक्षिक आम्हांला दाखविण्यांत आलें. शेंदोनशें विद्यार्थ्यांनीं मवाल्यांसारखे कपडे केले होते आणि हातांत काठ्या, दगड घेऊन सरकारविरुद्ध आरोळ्या ठोकीत ते पुढें येत होते. खरोखरच दंगेखोर येताहेत असें वाटत होतें. अश्रुधूर-पोलिसांची तुकडी अधिकाऱ्याच्या हुकूमाची वाट पहात शिस्तींत उभी होती. विशिष्ट टप्प्यांत तो घोळका आल्याबरोबर अधिकाऱ्याने हुकूम दिला, आणि फडाफड् अश्रुधुराचे गोळे फोडीत पोलीस पुढें घुसले. दंगेखोरांची पांगापांग झाली. मात्र दंगेखोर हे खरे पोलीसच

असल्यामुळें त्यांच्या डोळ्यांत धूर फारच थोडा गेला. ते शिस्तींत पांगले. आम्हां पाहुण्यांच्या डोळ्यांतून मात्र अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या! प्रिन्सिपॉल साहेबांनीं ग्लिसरीन तयार ठेवलें होतें. तें डोळ्यांना लावल्यावर आम्ही डोळे उघडूं शकलों!

फिलौरच्या पोलीस ट्रेनिंग स्कूलमध्यें असे नाट्यपूर्ण अनुभव घेतां घेतां सबंध दिवस केव्हां गेला तें समजलें नाहीं!

—लोकवाणी, दिवाळी १९५६

# हिमालयाच्या कुशींत

नगाधिराज हिमालयाला फक्त एकच अपत्य म्हणजे त्याची कन्या पार्वती, अशी पुराणांतल्या कथेवरून इतके दिवस माझी कल्पना होती. पण हिमालयाला पुष्कळ बालकें आहेत, आणि भारत स्वतंत्र झाल्यावर त्यांचा एक स्वतंत्र घटक प्रदेश झाला आहे— हे नुकतेंच भारत सरकारनें लेखकपत्रकारांना देशांतल्या निरनिराळ्या विकास-योजना दाखविण्याकरितां नेलें तेव्हा मला चांगलेंच कळलें. या प्रदेशाचें नांव हिमाचल प्रदेश. या प्रदेशांतले लोक हिमालयाच्या कुशींत राहतात आणि त्याच्या अंगाखांद्यावर खेळतात. भारत स्वतंत्र होण्यापूर्वी असा वेगळा प्रदेश नव्हता. मंडी, धरमपूर वगैरे तीस संस्थानांत हा प्रदेश विखुरलेला होता. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संस्थानें विलीन झाली; आणि आधुनिक सुधारणेचा वासहि न लागलेल्या अशा डोंगरकपारींतल्या चौदा हजार खेड्यांत राहणाऱ्या या अकरा लाख हिमाचलवासीयांना स्वतःचा असा प्रदेश, प्रातिनिधिक विधान-सभा, स्वतःचा मुख्य मंत्रि आणि उपराज्यपाल मिळाला. हिमाचलाच्या सीमा उत्तरेला काश्मीर आणि तिबेटला भिडतात, तर दक्षिण बाजूला पंजाब आणि उत्तर प्रदेश आहेत. हिमालयाचीं शुभ्र हिमाच्छादित शिखरें जिथून दिसत नाहीत असा भाग या प्रदेशांत नाहींच म्हटलें तरी चालेल. पाइन, फर, सेडार, देवदार इत्यादि गगनचुंबी वृक्षांच्या काळसर हिरव्या जंगलांनी या प्रदेशाचा एकतृतीयांशाहून अधिक भाग व्यापला आहे. पंधराशें ते पंधरा हजार फुटांपर्यंत कमी-अधिक उंचीची इथली भूमि असल्यामुळें, आंबा, केळीं, पेरू इत्यादि उष्ण प्रदेशांतली फळें इथे पिकतातच; पण द्राक्षें, बदाम, पिस्ता वगैरे समशीतोष्ण

प्रदेशांतली आणि चेरी, स्ट्रॉबेरी, ॲपल, पेअर, पीच इत्यादि थंड हवेंतली फळेंहि इथें मुबलक होतात. बटाट्यांचें पीक हें या प्रदेशाला पैसा देणारें पीक आहे; आणि नव्या विकास-योजना पुऱ्या झाल्या, कीं एकंदर भारताला लागणाऱ्या बटाट्यांपैकीं एकतृतीयांश एकटा हिमाचल प्रदेश पुरवूं शकेल.

गांव, खेडें, घर, रस्ता, शेत, या शब्दांनीं सामान्यपणें जें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें राहतें तें या प्रदेशांचा विचार करतांना पार बदललें पाहिजे. खडक फोडून डोंगराच्या कपारींत एकाखालीं एक उतरत्या पाडलेल्या खापा म्हणजे इथलें शेत. वरखालीं, गोल, आडव्या-तिडव्या जाणाऱ्या वाटा म्हणजे रस्ते, डोंगराच्या लहान–मोठ्या पुढें आलेल्या कडांवर दगड-लांकडें रचून बांधलेली खोपटीं म्हणजे घरें; असलीं एक-दोन घरें म्हणजे वाडी: आणि दोन-तीन वाड्या म्हणजे खेडें! थंडीच्या दिवसांत बर्फाचे ढीग पडून कित्येक महिने रस्ते बंद झालेले असतात. हिमाचलवासीयाला निसर्गाशीं अविरत झटापट करीत जीव जगवावा लागतो! डोंगराच्या कपारींत मोठ्या मेहनतीनें पिकवायचें; जंगलांतलीं लांकडें आणून तें शिजवायचें; मेंढीचें किंवा गाईचें दूध काढायचें; आणि मेंढ्यांच्या अंगांवरील लोकरीचें वस्त्र करायचें: या उद्योगांत इथलीं माणसें सतत मग्न झालेलीं असतात. आजोबा, बाप, मुलगा, मुलगी, आई, भाऊ, सगळेंच कुटुंब सारखेंच खपत असतें; आणि कुटुंब म्हणजेच जवळजवळ सर्व खेडें असा प्रकार असल्यामुळें हे लोक नकळत सोशालिस्ट आहेत, असें म्हटलें पाहिजे! इथला माणूस स्वतःचा स्वतःच सुतार, सोनार, शिंपी, चांभार, घर बांधणारा असतो. पण स्वतःचें स्वतःलाच सर्व करावें लागतें, म्हणून तो स्वयंकेंद्रित किंवा एकलकोंडा मुळींच नसतो; किंबहुना, म्हणूनच केव्हां एकदां स्वतःला विसरून इतरांशीं मिसळेन अशी ओढ त्याला लागलेली असते. गावदेवतांचे उत्सव, नव्या ऋतूंचें आगमन, अशीं नाना निमित्तें करून तो सामुदायिक नाच आणि गाण्यांत गुंगून जातो!

भारत स्वतंत्र झाला आणि एक नवें वारें इथें आलें. हा हिमाचल आपला आहे आणि आपण कुणी तरी आहोंत असें या लोकांना वाटूं लागलें. जुन्या मध्य युगीन राज्यकारभाराचे अवशेष केरकचऱ्यासारखे उडविले गेले. भारताच्या नव्या सरकारानें रस्ते, दवाखाने, शाळा, हिमालयाच्या कोनाकोपऱ्यांत नेण्याचें ठरविलें. पंचवार्षिक योजनेंतले विकासकार्यक्रम डोंगरकपाऱ्यांत येऊन थडकले.

हिमाचल प्रदेशांतलें हेंच कार्य पाहण्याकरितां आम्ही सिमल्याला आलो होतों. हिमाचल प्रदेशाचे लेफ्टनंट गव्हर्नर, विधानसभा, मुख्य मंत्रि सिमल्यांतच असतात.

सकाळीं आठ वाजताच सिमल्याजवळच्या मशोब्रा गांवांतील राष्ट्रीय विस्तार कार्याचें एक केंद्र पाह्यला जीप गाड्यांतून बाहेर पडलो. हिमाचल प्रदेशांत गांवोगांव आता ग्रामपंचायती स्थापन होत आहेत. त्यांचे कार्यवाह तयार करणारें एक केंद्र वाटेंत लागलें. तिथें थोडा वेळ थांबलो. छानदार एकमजली इमारतीत हें केंद्र आहे. पूर्वी ही इमारत एका प्रख्यात युरोपियन हॉटेलाच्या मालकीची होती. वरच्या मजल्यावर वर्ग चालला होता तिथें केंद्राचे प्रिन्सिपल आम्हाला घेऊन गेले.

गांवपंचायतींचे भावी कार्यवाह वर्गात बसले होते. या पहाडी लोकांचे चेहरे आणि शरीरयष्टि गुरख्यांसारखी दिसते; पण त्यांचा वर्ण मात्र अगदीं साहे बांच्यासारखा तांबूस-गोरा असतो. पहाड्यांचे कपडे मासलेवाईक असतात. हवा नेहमींच थंड असल्यामुळें कपडे गरम कापडाचेच पाहिजेत. बहुतेकांच्या अंगावर एक बंद गळ्याचा, काळ्या गरम कापडाचा लांबलचक मळकट कोट, धुळकट झालेली पांढरी सुरवार किंवा पायजमा, आणि डोक्यावर विशिष्ट पहाडी टोपी होती. ट्राम कंडक्टरच्या टोपीसारखी ही गरम कापडाची वाटोळी काळी टोपी असते, पण पुढच्या बाजूला हिच्यावर सोनेरी जरतारी काठाची एक लाल किंवा निळी मखमली पट्टी लावलेली असते. सिमल्यामध्यें फॅशन म्हणूनसुद्धां कांहीं सुशिक्षित तरुण या टोप्या अलीकडे वापरूं लागले आहेत!

कार्यवाह वर्गातल्या विद्यार्थ्यांत एक साठ वर्षांचा म्हातारा होता, तर एक एकोणीस वर्षांचा मुलगा होता. हा एकाद्या युरोपियन मुलासारखा गुटगुटीत दिसणारा, वाटत होता पंधरा वर्षांचाच! इथें दोन महिने शिक्षण घेऊन आपापल्या खेड्यांत ग्रामपंचायतीचे कार्यवाह म्हणून काम करायला हे सर्व जाणार होते. इथून जवळच मशोब्र्याच्या गांवकऱ्यांनी स्वतः पैसे उभे करून श्रमदानानें बांधलेली एक शाळा पहायला आम्ही गेलों. हिमाचलांत 'जवळच' याचा अर्थ फार फसवा आहे. शाळेचें छप्पर रस्त्यावरून समोर कांहीं यार्डांवर दिसत होतें 'जवळच' आहे म्हणून पुढें जायला लागलों तेव्हां एक टेंकाड उतरून दुसरें टेंकाड चढतांचढतां पायांत गोळे आले! दहावींतल्या एका मुलाला तूं कुठला

म्हणून आम्हीं विचारलें, तेव्हां दहा मैलांवर असलेल्या एका खोऱ्यांतल्या खेड्यांतून तो रोज शाळेंत येतो असें कळलें !

या केंद्राकडे येतांना वाटेंत रस्त्यावर जीपगाड्या उभ्या करून हिमाचलच्या संपर्काधिकाऱ्यांनीं उंच उंच पाइन वृक्षानीं भरलेल्या एका लहानशा खोऱ्यांत आम्हांला नेलें. "अगदीं निर्जन, एकांत अशा या जागीं 'फेअरलॉन्' नांवाचा एक राजवाड्यासारखा बंगला आहे तो तुम्ही पाहा,—" ते म्हणाले. बंगला आणि तिथून आजूबाजूला दिसणारा दऱ्याखोऱ्यांचा देखावा खरोखरच अलौकिक होता. बंगल्याभोवतालच्या बागेत सफरचंद, पेअर, 'वीपिंग विलो' वगैरे झाडांची दाट राई होती. 'वीपिंग विलो' हा वृक्ष खरोखरच एखाद्या शोकमग्न स्त्रीची आठवण करून देतो. एकादी स्त्री अनिवार दुःखानें स्फुंदत खाली पाहात उभी असावी, आणि तिचे लांबसडक मोकळे केस जमिनीवर लोळत असावे, असें कांहीं तरी, या वृक्षाच्या नाजूक पानांनीं बहरलेल्या, खालीं लोंबत असलेल्या फांद्या पाहून वाटतें खरें. पाकिस्तानांत गेलेल्या एका नबाबाचा हा बंगला सध्यां सरकारकडे आहे.

इथून अशाच दुसऱ्या एका नबाबाच्या सरकारनें घेतलेल्या बंगल्यात असलेलं 'एक्स्टेन्शन ट्रेनिंग सेंटर' किंवा तिथं असलेल्या हिंदी पाटीवरून बोलायचें म्हणजे 'प्रसार प्रशिक्षण केंद्र' पाह्यला गेलो. या केंद्रांत ग्रामसेवक आणि ग्रामसेविका तयार करण्यांत येतात. महिना तीस रुपये शिष्यवृत्ति इथल्या विद्यार्थ्यांना मिळते. खेड्यापाड्यांत विकासाचीं कार्यं खेडुतांच्या स्फूर्तीनं आणि सरकारी साहाय्यानें समाजविकास योजनेनुसार चालू झालीं आहेत. आपण पगारी नोकर नसून खेडुतांपैकींच एक आहोत, अशा भावनेनं खेडुत जीवनाशीं समरस होऊन या ग्रामसेवकानीं किंवा सेविकानीं इथला शिक्षणक्रम पुरा केल्यावर आपापल्या खेड्यांत जाऊन खेडुताना शिकविण्याचें काम करावयाचें असतें. नव्या नव्या खतांचे उपयोग, बांबूकाम, कुंभारकाम, सतरंज्या विणणें, सुतारकाम वगैरे कामांची माहिती सेवकांना आणि विणकाम, भरतकाम, लोणचीं, मुरंबे तयार करणें वगैरेंचें ज्ञान सेविकांना इथे देण्यांत येतें. त्याशिवाय खेड्यांची स्वच्छता, आरोग्य, परस्परसाहाय्य हे विषय शिक्षणक्रमांत आहेतच. केंद्राच्या जवळच शेतीचे प्रयोग करण्याची जागा आहे. तिथें विद्यार्थ्यांना रोज कांही तास काम करावें लागतें. केंद्राच्या एका चुणचुणीत शीख शिक्षकिणीनं खेड्यांतल्या

बायकांनीं केलेल्या कापडी बाहुल्या, रंगविलेल्या बांबूचीं फुलपात्रें, विणकाम केलेली मुलांचीं झबलीं वगैरे वस्तू दाखविल्या.

जगांतील जवळजवळ सर्व प्रकारचीं फळें हिमाचल प्रदेशांत पिकूं शकतात. पण फळांचें भरपूर पीक कसें काढायचें किंवा फळांच्या जाती सुधारायच्या कशा याची इथल्या खेडुताला कांहीच कल्पना नव्हती. पूर्वीच्या संस्थानी राजसत्तेनें याकडे लक्षहि दिलें नव्हतें. 'कूट्स् ऑर्चर्ड' नावाची कुणा युरोपियनाची पंधरा एकरांची एक फळबाग होती, ती विकत घेऊन, जवळपासचें दहा एकर जंगल तिला जोडून सरकारनें एक फल-संशोधन केंद्र मशोब्रा गांवाजवळ स्थापन केलें आहे. 'गव्हर्मेंट फ्रूट रीसर्च फार्म' हें या संस्थेचें इंग्रजी नाव एका पाटीवर आहे. त्याच पाटीवर या इंग्रजीचें हिंदी, 'राजकीय फल अनुसंधान क्षेत्र' असें आहे!

संस्थेचे उत्साही चालक श्री. थापर आम्हाला निरनिराळ्या फळझाडांचीं रोपटीं दाखवीत होते. डोंगराच्या कडेला एकाखालीं एक खापा पाडून तिथल्या जमिनींत रोपांच्या रांगा लावल्या होत्या. ॲपल, पेअर, ॲप्रिकॉट्, चेरी, पीच्, वगैरे युरोपांतील फळांचीं झाडें इथें तरारून वाढतात. कांहीं झाडांना फळेंहि आलीं होतीं. एका पीचच्या झाडाला, मुठींत मावणार नाहीं एवढें मोठें पीचचें कच्चें फळ होतें. 'हें संपूर्ण पिकल्यावर आतां हिरवट आहे तें तांबूस पिवळें होईल आणि त्याचें वजन एका पौंडापेक्षां अधिक होईल!', थापर म्हणाले. ही पीचची जात अमेरिकेकडून आणवली आहे. या पीचचें नांव 'हाल्बर्टा जायन्ट'. ही जात इथें तयार झाली कीं तिचें बीं इथल्या शेतकऱ्यांना वांटण्यात येईल. कांहीं फळांच्या पंधरापंधरा वीसवीस जाती असतात. ॲपल किंवा सफरचंदाच्या बारा जातींचीं रोपटीं इंग्लंडहून आणलीं आहेत. त्या फळांचे रंग निराळे, आकार लहान-मोठे, त्यातल्या त्यांत रुचीहि वेगवेगळी असते म्हणतात. 'रेड डिलिशस' ॲपल् संबंध तांबडेंलाल असतें, तर 'गोल्डन डिलिशस संबंध सोनेरी पिवळें असतें. 'रूस् पिप्पिन्', 'ग्रॅनी स्मिथ्', 'बाल्डविन्'—सफरचंदांचीं नांवें तरी किती!

फळें पिकवण्याचा व्यवसाय व्यवस्थितपणें केला तर तो चांगलाच फायद्याचा आहे असें दिसतें. थापर म्हणाले, 'एकपंचमांश एकर जागेत ॲपलचीं म्हणजे सफरचंदाचीं वीस झाडें लावतां येतात. खतपाणी नीट केल्यास एका झाडाला वर्षाकांठीं तीस मण फळ येतें. फळाचा भाव मणाला कमींत कमी चाळीस रुपये आहे.

एखाद्या खेडुत-कुटुंबानें एकपंचमांश एकर जागेत सफरचंदें लावली तर खर्चवेंच जाऊन वर्षाला हजार रुपये मिळायला हरकत नाही.' एका लहानशा पीचच्या रोपट्यावर ॲपल्, ॲप्रिकॉट्, आणि पेअर झाडांच्या छोट्या फांद्या कलम केल्या होत्या आणि एकाच झाडावर चार प्रकारचीं फळें पिकविण्याचा प्रयोग चालला होता! एका सफरचंदाच्या झाडावर सूर्यप्रकाशांत तुकतुकणाऱ्या लालबुंद फळाचे गेंदच्या गेंद फांद्याफांद्यांना लटकले होते. त्यांच्याकडे आम्ही पाहातच राहलो. जिभेला पाणी सुटूं लागलें! हात चुळबुळूं लागले; पण सरकारी फळांना प्रतिष्ठित पत्रकारांनीं हात कसा लावायचा! थापर साहेबांच्या ध्यानांत आमची तगमग आणि चुळबूळ आलेली दिसली. ते हंसून म्हणाले, 'आता आपण फळ किंवा फळाचे रस टिकवून ठेवण्याच्या प्रयोगशाळेंत जाणार आहोत. तिथें टोपली भरून ताजीं सफरचंदें तुमच्यासाठीं काढून ठेवली आहेत!' आम्हीं शांत मनानें प्रयोगशाळा पाहिली; आणि बराच उशीर झालेला असल्यामुळें तिथली सफरचंदें खिशांत भरून वाटेंत खात खात सिमल्यातल्या हॉटेलाकडे परतलो!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं छरब्रा येथील 'बेसिक ॲग्रिकल्चरल स्कूल' पाहिलें. 'वाइल्ड् फ्लॉवर हॉल' नांवाच्या एका अतिशय सुंदर इमारतीत ही शाळा आहे. आजूबाजूला तेवीस एकर पसरलेली नाना रंगाच्या फुलांची आणि फळांची बागबागाईत आहे. पन्नास वर्षांपूर्वी ही जागा त्या वेळचे भारताचे सरसेनापति लॉर्ड किचनेर याची होती. आता या जागेत खेड्यांतल्या कार्यकर्त्यांना शिक्षण देण्यांत येत आहे. शेती, बागाईत, दूधदुभतें, गुरांचे रोग, वगैरे विषयांचा एक वर्षाचा अभ्यासक्रम पुरा करून कार्यकर्ते आपल्या खेड्यांत कामाला जातात. आठ हजार सातशें फूट उंचीवर असलेल्या या जागेवरून आजूबाजूच्या पाइन, फर, देवदार वगैरे उंच उंच वृक्षांच्या गर्द झाडीनें भरलेल्या दऱ्या-खोऱ्यांचें भव्य दर्शन होतें.

इथून आम्ही हिंदुस्थान—तिबेट रस्त्यावरील 'कुफ्री' या आणखीच उंचावर असलेल्या ठिकाणीं गेलों. वाटेंत डोंगराच्या कडेला बटाट्याची शेतें दिसली. रांगेनें लावलेल्या छोट्या छोट्या झाडांना जांभळट-गुलाबी रंगाचीं फुलें दिसत होतीं. सिमल्यापासून तिबेटच्या सीमेपर्यंत हा एकशें शहाण्णव मैल लांबीचा रस्ता अनेक दुर्गम खडक फोडून आपलें सरकार तयार करतें आहे. इथले लोक याला चिनी रस्ता म्हणतात. तिबेट चीनमध्यें आहे म्हणून नव्हे,

तर तिबेटजवळच्या हिमाचल प्रदेशाच्या या भागाला चिनी हेंच नांव आहे म्हणून. चिनीची हवा कोरडी असल्यामुळें बदाम, पिस्ता, डाळिंब वगैरे फळें इथं फार मोठ्या प्रमाणावर पिकतात. अफगाणिस्तानाहून मुद्दाम या फळांच्या उत्तम जातींचे बीं बियाणं आणून सरकार इथल्या हजारो शेतकऱ्याना तें वांटीत आहे. शुभ्र हिमालयाची कूस अशा तऱ्हेनें आतां सस्यश्यामल, सुफल होत आहे.

—श्रीमरस्वती, दिवाळी १९५६

# लाल रक्तांतून उगवलेलें निळें कमळ

'नीलोखेरी' हें नांव भारताची फाळणी झाल्यापासून पुष्कळ दिवस ऐकत होतों. भारताचे दोन तुकडे झाले. रक्ताच्या नद्या वाहल्या, अग्नीच्या ज्वाळांत गावेंच्या गांवें बेचिराख झालीं. हें सगळें तें नांव कानावर आलें कीं, डोळ्यापुढें उभें राही. पण त्याबरोबरच त्या रक्तमांस-राखेच्या चिखलातून एक सुंदर निळें कमळ वर आलें आहे असें एक चित्र दिसे. 'नीलोखेरी' चें नांव आणि इतिहास ऐकून सुचलेली ही एक कल्पना. यापेक्षा यांत अधिक कांही नाहीं.

नीलोखेरी हें पंजाबमधलें नवीनच निर्माण केलेलें एक गांव आहे. १९४७ मध्यें पंजाब विच्छिन्न झाला आणि पाकिस्तानी पंजाबमधून भारतीय पंजाबमध्यें लक्षावधि निर्वासिताचा लोंढा आला. नवीनच स्वतंत्र झालेल्या भारतदेशावर कोसळलेला तो भयंकर प्रसंग होता. पण या देशानें त्या प्रसंगाला अलौकिक धैर्यानें तोंड दिलें. त्या धैर्याचें प्रतीक म्हणजे नीलोखेरी. दिल्लीपासून सत्तर ऐंशीं मैलांवर आणि पंजाबमधल्या कर्नाल या जिल्ह्याच्या ठिकाणाच्या पुढें अकरा मैलांवर नीलोखेरी आहे. नीलोखेरी स्टेशनहि दोन फलाटांचें, छोटेसें उघडें स्टेशन आहे. नीलोखेरीला जवळ असलेलें मोठें स्टेशन म्हणजे दहाबारा मैलांवरलें 'कुरुक्षेत्र'.

महाभारतांत कुरुक्षेत्र गाजलें. त्यानंतर विशिष्ट ग्रहणाच्या दिवशीं लाखों यात्रेकरू साऱ्या भारतांतून कुरुक्षेत्रांतल्या तलावांत स्नानाला येतात म्हणून तें गाजत होतें. यात्रेकरूंच्या सोयीकरितां कुरुक्षेत्र स्टेशनांत रेल्वेनें बांधलेल्या प्लॅटफॉर्मांइतके लांबरुंद प्लॅटफॉर्म मी अजून कुठें पाहिलेले नाहींत! पंजाबच्या

फाळणीनंतर कुरुक्षेत्र पुन्हां गाजलें, कारण पंजाबमधून आलेल्या लाखो निर्वासितांसाठीं भारत सरकारनें उभारलेला मोठयांत मोठा कॅप कुरुक्षेत्रींच होता. या लोकांना खाणें, पिणें, कपडालत्ता पुरविण्याचेच नव्हे तर त्यांना जरूर असलेले मुतार, सोनार, लोहार, कुंभार, शिपी देण्याचें आणि जरूर तीं दुकानें, कारखाने उघडण्याचें कामहि सरकारलाच करावें लागलें. पंजाबच्या या विशिष्ट भागांत ही सर्व कामें करणारे कामगार, कारागीर, दुकानदार मुसलमान होते. ते सर्व पाकिस्तानत पळाले होते. तेव्हां या व्यवसायाच्या शिक्षणाची ताबडतोब व्यवस्था करणें प्राप्त झालें. सरकारनें कॅम्पमध्यें एक व्यवसाय शिक्षणकेंद्र सुरू केले. त्यांत विणकाम, रंगकाम, छापकाम, शिंपीकाम, साबू तयार करणें वगैरे कामें शिकवण्यांत येऊं लागली. हातमागाच्या मूलोद्योगाकरतां हवे असलेले माग हव्या तितक्या प्रमाणात मिळेनात. तेव्हां केंद्रांत सुतारकामाची शाखा उघडण्यात आली. बाहेरून सुतारकामाला आवश्यक असलेली हत्यारें कमी पडूं लागली तेव्हां लोहारकामाची शाखा जोडली. अशा तऱ्हेनें हें व्यवसायशिक्षण केंद्र खूपच वाढलें. आठदहा महिन्यांत तीनशें कामगार तयार होऊन केंद्राबाहेर पडले आणि सातशें शिकत होते.

१९४८ च्या एप्रिल महिन्यांत सरकारनें ठरविलें कीं, असे तात्पुरते कॅंप किती दिवस ठेवायचे—निर्वासितांसाठीं नवीं नवीं गांवें वसविलीं पाहिजेत. कुरुक्षेत्रांतल्या कॅंपचेंच गांव करतां आलें असतें; पण कॅंपचा प्रदेश सखल आणि पावसाळ्यांत तुडुंब तळें होईल असा होता. तेव्हां दहा बारा मैलांवर ग्रँड ट्रंक रोडला लागून असलेलें नीलोखेरीचें जंगल साफ करावें आणि तिथें एक नवें गांव वसवावें असें ठरलें. हजारों लोक कामाला लागले. कोल्हे, लांडगे, साप, विंचू इत्यादि शेकडो हिंस्र प्राण्यांचे वसतिस्थान असलेलें हें जंगल कांही महिन्यांत साफ होऊन एक नवें गांव त्याच्या जागीं आकाराला येऊं लागलें. दोनतीन महिन्यांतच कुरुक्षेत्रांतले व्यवसायशिक्षणकेंद्र नीलोखेरीला हालविण्यांत आलें.

गावें किंवा शहरें आजूबाजूच्या लोकांच्या सोईप्रमाणें हळूहळू आकार घेत असतात, आणि तीं पूर्ण आकाराला यायला शेंकडो वर्षे लागतात. नीलोखेरीचें तसें नव्हतें. कांहीं नव्हतें तिथे सर्व सोयींनीं युक्त अशी एक नगरी झटपट उभी करावयाची होती. या नगरींत उध्वस्त झालेली जीवनेंहि पुन्हां नवीं उभीं कराव-

याचीं होतीं. तेव्हां नीलोखेरीलाच नव्हे तर आसपासच्या गांवांनाहि जीवनावश्यक गोष्टी तावडतोब पुरवूं शकेल असें एक स्वयंपूर्ण नगर निर्माण करणें प्राप्त झालें. शेती, दूधदुभतें, कोंबड्या, भाजीपाला, ग्रामोद्योग, छोटे उद्योग इत्यादि सर्व व्यवसाय नीलोखेरीला सुरू करण्यांत आले. पाचसहा मैलांतल्या टापूला सिमेंट, पेट्रोल, पोलाद यांसारख्या गोष्टीखेरीज इतर सर्व बाबतींत–अन्न, वस्त्र, निवारा वगैरेंत स्वयंपूर्ण करून टाकील अशी एक नवी शहरवजा ग्रामव्यवस्था निर्माण करण्याचा हा प्रयोग होता. हा प्रयोग इथें यशस्वी झाल्यास साऱ्या देशभर असल्या समाजविकास योजनांचे जाळे पसरून या देशांत विकेंद्रीकरणावर आधारलेल्या स्वयंपूर्ण घटकांची एक नवी लोकशाही या प्रयोगांतून अस्तित्वांत येईल, हेंहि स्वप्न प्रयोग करणारांच्या डोळ्यासमोर तरळत होतें. आता सर्वत्र पसरत चाललेले समाजविकास प्रकल्प (कम्युनिटी डेव्हलेपमेंट स्कीम), राष्ट्रीय विस्तार कार्य (नॅशनल एक्स्टेन्शन सर्व्हिस), समाज शिक्षण केंद्रे (सोशल एज्युकेशन सेंटर्स) वगैरेंचा उगम हा असा आहे.

ज्या नीलोखेरीबद्दल इतकें हे ऐकत होतो ती नीलोखेरी आतां पहायला मिळणार होती. आगगाडीच्या एका खास डब्यांतून भारतातल्या कांही पत्रकारांना आणि लेखकांना पंजाब, हिमाचल, पतियाळा वगैरे प्रदेशातल्या विकास योजना दाखविण्यासाठीं सरकार नेणार होते.

दुपारीं साडेतीनला दिल्ली स्टेशन गाडीनें सोडलें तेव्हां जूनमधल्या दिल्लीच्या रखरखीत उन्हानें डबा तापून गेला होता. सोनपत स्टेशन गेलें, पानिपत स्टेशन गेलें आणि कांही वेळानें पंजाबचा हरियाना भाग दिसूं लागला. हरियानाची जमीन आणि गुरें फार प्रख्यात आहेत. पुण्याच्या किंवा कुठल्या तरी शेती–प्रदर्शनांत पूर्वी मी हरियाना गाई आणि बैल पाहिले होते. खूप उंच, धिप्पाड, लांबलचक आणि पांढऱ्या शुभ्र रंगाचीं हीं जनावरें असतात. मला आश्चर्य वाटलें, क्षितिजापर्यंत पसरलेली हरियानाची पांढरी जमीन गाडींतून पाहिली तेव्हां. काळी माती पाहिली होती, तांबडी माती पाहिली होती, पण ही माती चुन्याइतकी नाही तरी जवळजवळ पांढरी होती. या पांढऱ्या मातींत वाढल्यामुळें ही जनावरेंहि पांढरीं शुभ्र होतात कीं काय?

इतक्यांत जोराचा वारा सुटला आणि धुळीचें वादळ सुरू झालें. ज्या पांढऱ्या मातीचा विचार करीत होतो ती बरीचशी आंत आली. डब्याचीं कांचेचीं तावदानें

भराभर लावावीं लागली. कांही वेळानें जोराच्या पावसाच्या सरी आल्या आणि तापडलेला डब्बा थंड झाला. रात्रीं ८ च्या सुमारास नीलोखेरी स्टेशन आलें.

स्टेशनांत विकास योजनांचे अधिकारी आम्हांला उतरवून घेण्याकरतां जीप-गाड्या वगैरे घेऊन आलेच होते.

नीलोखेरी विकास गटांत १५७८७२ एकर क्षेत्रफळाचीं १३५ खेडीं येतात. त्या सर्वांची एकंदर लोकसंख्या ७६,००० आहे. कांहीं निवडक खेडीं आणि कार्यकर्ते तयार करावयाचीं शिक्षणकेंद्र आम्हाला पहावयाचीं होतीं. प्रातरुपाहार करून सकाळीं साडेसहालाच जीपगाड्यांतून आम्ही बाहेर पडलों. पहिल्यांदा 'पॉलिटेक्निक' किंवा विविध व्यवसाय शिक्षणकेंद्र पहावयाला गेलो. रविवार असल्यामुळें विद्यार्थी नव्हते, पण प्रिन्सिपॉलसाहेबांनीं व इतर अधिकाऱ्यांनीं लोहारकाम, सुतारकाम, ट्रॅक्टरची दुरुस्ती, छापखान्याचें काम, रेडिओ मेकॅनिक्चें काम वगैरे कामे शिकविण्याचे विभाग दाखविले. अभ्यासक्रम पांच वर्षांचा असतो. त्यापैकीं तीन वर्षे इथे शिकावयाचें आणि दोन वर्षे अधिकृत अशा कारखान्यांत काढावयाचीं.

इथून सरळ खेडीं पहावयास निघालो.

ग्रँड्ट्रंक रोडवरून आंतल्या बाजूला फक्त एक मैलावर असलेलें मैनी खुर्द खेडें आमच्या कार्यक्रमांत पहिलें होतें. आपल्याकडे खुर्द आणि बुद्रुक असतात तशींच इथे पंजाबमध्यें 'कलां' आणि 'खुर्द' असतात. 'कलां' म्हणजे मोठें, 'खुर्द' म्हणजे लहान. मुख्य मोटररस्त्यापासून एक मैल असूनहि आठ वर्षांपूर्वी या खेड्याला जायचा रस्ता चिखल आणि डबक्यांनीं भरलेला होता असें म्हणतात. खडबडीत, पण जीप जाऊं शकेल असा रस्ता आतां गांवकऱ्यांनीं तयार केला आहे. दरवर्षी पावसाळ्यापूर्वी ते तो नीटनेटका करतात. आमची जीप जात असतां कुदळीफावडीं घेऊन कांहीं गांवकरी हेंच काम करीत असलेले रस्त्यांत आम्हांला दिसले. पांढरा चुना लावलेल्या एका लहानशा घरासमोर आम्ही उतरलों. प्राथमिक शाळेची ही इमारत. शाळेसमोर मुलाना खेळायला बरीच मोकळी जागा होती. गांवाचा सरपंच तानसिंग आमच्या स्वागताला उभा होता. काचा मारलेलें मळकट धोतर, कमरेइतकें कुडतें आणि डोक्याला वाकडातिकडा गुंडाळलेला फेटा असा वेष असला तरी शरिरानें चांगला दणकट आणि ताडमाड उंच होता तो. देवळाच्या

सभामंडपासारखी शाळेची एकच मोठी खोली होती. जमीन चांगली सारवलेली होती. भिंतीवर पशुपक्ष्यांची चित्रें आणि इतर तक्ते व्यवस्थित लावलेले होते.

शाळेच्या पलीकडे कांहीं अंतरावर चुना फासलेली, दोन खोल्यांची एक छोटी इमारत होती. हे पंचायत घर. एका खोलीत गांवपंचायतीच्या सभा होतात. दुसऱ्या खोलीत एक जुनाटसा, बॅटरीवर चालणारा रेडिओ, कांहीं हिंदी, उर्दू मासिके, कांहीं कापून लावलेली चित्रे वगैरे असलेलें गांवाचें वाचनालय होतें. पंचांनीं सभेच्या खोलीत आमच्यासाठीं थंडगार लस्सी मडकीं भरून ठेवली होतीं. दोनदोन तीनतीन ग्लासें 'लस्सी' घेऊन, गांवांतली घरें, रस्ते वगैरे पहायला आम्ही बाहेर पडलो. आठदहा फूट रुंदीचेच पण गांवांतच केलेल्या चिमुकल्या विटांची फरशी केलेले आडवे उभे रस्ते सबंध गांवांत दिसले. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पाणी वाहून जाण्याकरतां गटारें होतीं. कोपऱ्या कोपऱ्यावर लाकडी खांबावर बसवलेले घासलेटचे दिवे होते. गावाची मुख्य विहीर चागली उंचावर सिमेंटनें बांधून काढलेली, आजूबाजूचें पाणी वाहून जाण्याकरतां सभोंवार सिमेंटची जमीन केलेली होती.

आमच्याबरोबर असलेले डेव्हलपमेंट् ऑफिसर श्री. मुर्जानसिंग गिल् म्हणाले, "चारपांच वर्षांपूर्वी तुम्ही या गांवात आलां असतां तर येतांयेतांच गुडघाभर चिखलांतून उड्या मारीत यावें लागलें असते, आणि गांवात फिरताना डबक्या-वरून उड्या माराव्या लागल्या असत्या! शाळा, वाचनालय दिसलेंच नसतें. धुण्याचं, घासलेल्या भांड्यांचं पाणी विहीरीभोंवतीच झिरपून जातंय्, हें पाहून विहीरीचं पाणी प्यायची तुम्हांला इच्छाहि झाली नसती. विकास प्रकल्पातर्फे सरकार थोडाबहुत खर्च देतें, पण निम्याहून अधिक खर्च गांवकरी आपापसांत पैसे जमवून आणि विनामूल्य मजूरी देऊन करतात. या स्वयंस्फूर्तीत आणि स्वतःचा उद्धार स्वतः करण्याच्या प्रवृत्तींतच आमच्या विकास योजनांचें खरें यश आहे. या गटातल्या एकंदर १३५ खेड्यावर विकासाकरतां आतापर्यंत साडेसात, आठ लाख रुपये खर्च झालाय. त्यापैकीं साडेचार ते पांच लाख रुपये या खेड्यांनल्या गांवकऱ्यांनींच उभे केलेत. जवळ जवळ सव्वालाख रुपये पंचायतीनं रोख गोळा केले. सव्वा दीड लाख किमतीची जमीन गांवकऱ्यांनीं दिली आणि जवळ जवळ तितक्याच रकमेची मजूरी फुकट दिली. रस्ते, भोंकाच्या विहीरी, खताचे खड्डे, कृत्रिम उपायांनीं चांगल्या गुरांची पैदास, कोंबड्या पाळण्याचे

उद्योग, कातडीं कमावण्याचीं आणि साबु करण्याचीं केंद्रें, फळझाडांची बागाईत, शाळा, करमणूक केंद्र, भजन सभा, खेळाडूंचे संघ, अशा अनेक पूर्वी नव्हत्या त्या नव्या गोष्टी या खेड्यांत आता दिसूं लागल्यात."

तानसिंगाला आम्ही विचारलें, "काय सरपंच साहेब, तुमच्या गांवांत नवीन काय काय झालं?"

तानसिंग म्हणाला, "सर्वच नवीन आहे, साहेब—रस्ते, शाळा, सिमेंटच्या विहिरी, वाचनालय, तरुण शेतकरी संघ, बायकांची सत्संग सभा, शाळेच्या बाहेरच्या बाजूला तुम्ही लहानशी खोली पाहिलीत ते प्रथमोपचार केंद्र, पंचायतीनं चालवलेली सहकारी पेढी, डांसांसाठीं आणलेले डी. डी. टी. पंप. पूर्वीपेक्षां शेतीसुद्धा खूप सुधारलीय्. नवीन प्रकारचे सतरा नांगर आणलेत गांवांत आम्हीं. वर्षाला दहा टन रासायनिक खत आतां आम्ही वापरतों. फळांचीं झाडं पूर्वीं नव्हतींच गांवांत. आता खूप लावलींत. पिकांच्या स्पर्धा दर वर्षी करतों. जास्तींत ज्यास्त पीक काढणाराना पदकं, बक्षिसं वगैरे देतों."

"पैसे कसे उभे करतां?" आम्ही विचारलें.

"प्रत्येकी दोन ते दहा रुपयांपर्यंत वर्गणी आपखुषीनें गांवकरी देतात. रस्ते सुधारण्यासाठीं पांच दिवसांची मजूरी प्रत्येक धडधाकट माणूस फुकट देतो." त्यानें उत्तर दिलें.

"गावांत एकंदर माणसं, गुरं किती आहेत?"

"माणसं सारी सहाशेंचाळीस आणि घरं आहेत सव्वाशें. साठसत्तर गाई, शंभर म्हशी, दीडशें बैल आणि दहाबारा उंट आहेत. सुतार, शिंपी, सोनार, लोहार एकेकच आहेत. चांभार मात्र सहा आहेत, आणि कातडी कमावणारे सात आहेत. आमचं रबी पीक–गहूं, चणे, बटाटा, तूर, मोहोरी, आणि खरीप पीक–ऊस, कापूस, मका, भात."

या पंजाबी खेड्यांतल्या शेतकऱ्यांचीं घरें पाहून मला आश्चर्य वाटलें. आमच्या कोकणातल्या किंवा घाटावरच्या शेतकऱ्याच्या मानानें शरिरानें पंजाबी शेतकरी उंच, उजळ, धिप्पाड. इथला गहूं चणाहि जसा भरदार आणि टचटचीत तशींच यांचीं घरेंहि आमच्या खेडवळ घरांशीं तुलना करतां चांगलींच ऐसपैस आणि भरभक्कम वाटली. बरींचशीं घरें चांगली वीटचुन्याची होती. एका चांगल्याशा घरांत आंत जाऊन आम्ही पाहिलं. चुना लावलेल्या दाराच्या कमानीवर

लाल हिरवीं पिवळीं फुलें पानें रंगवलेलीं होती. कमानीच्या आंतल्या बाजूला औते, नांगराचे फाळ वगैरे पडले होतें. त्या पुढच्या चौकांत डाव्या बाजूला चांगले पुष्ट गाईबैल रांगेनें बांधलेले होते. एका वेगळ्या गोठ्यांत एक उंट बसला होता. मोट ओढण्याला इकडचे शेतकरी उंट वापरतात. स्वयंपाकघराला लागून धान्याचें कोठार होतें. एका भिंतीला लहानशी लाकडाची फळी होती. तें कोठाराचें दार. फळी काढल्याबरोबर आमच्या हातांत सोन्यासारखा पिवळा टचटचीत गहूं आला.

कांहीं घरांवर काळ्या फळ्यांवर पांढरीं अक्षरें रंगवून शेतकऱ्यांनीं आपल्या नांवाच्या पाट्या लावलेल्या दिसल्या!—'साधुसिंग,' 'बनवारी'!

हरिजन वस्तींतलीं घरें चिखलमातीचीं होतीं. रस्तेहि अरुंद होते, पण बहुतेक घरांत बिनधुराच्या चुली होत्या—बिनधुराच्या म्हणजे धूर वरतीं जाण्याकरितां धुरांड्याची व्यवस्था असलेल्या. त्यामुळें घरें बरींच स्वच्छ दिसत होतीं. हरिजनांची विहीर चांगली उंचावर सिमेंटची बांधलेली होती. एका पत्रकारानें तानसिंगाला म्हटलें, "काय सरपंच, गांवांतल्या तुमच्या विहिरीवर हरिजन पाण्यासाठीं येतात कीं नाहीं?"

तानसिंग जरा बावरला, "हो—नाहीं. येतील—" असें चांचरूं लागला. आणखी प्रश्न विचारून त्याला कुणी त्रास दिला नाहीं. मैनी खुर्द मधलें कातडीं कमावण्याचें केंद्र पाहून आम्ही दुसऱ्या खेड्याकडे जायला निघालों.

हें शामगड खेडें मैनीखुर्दच्या तिप्पट मोठें होतें. इथेंहि सर्व नव्या सुधारणा आल्याच होत्या. शाळेच्या इमारतींतल्या बाहेरच्या कचेरीच्या खोलीच्या दाराला भलेभक्कम तुरुंगांच्या गजांसारखे गज पाहून मी म्हटलें, 'हें काय, बुवा?'. तेव्हां मुख्याध्यापक हंसत म्हणाले, "पूर्वीच्या पोलीस चौकीची आम्ही शाळा केली आहे. पकडलेल्यांना कच्चा कैदेंत ठेवायची ही खोली होती!"

तिसऱ्या बुटाना खेड्यांत विकासप्रकल्पातर्फे फिरतीं प्रदर्शनें कशीं भरवतात तें आम्हाला दाखवण्याकरतां एक प्रदर्शन अधिकाऱ्यांनीं भरवलें होतें. खास उभारलेल्या एका तंबूत हें प्रदर्शन होतें. भोंग्यांतून ध्वनिमुद्रिकांचे संगीत चालू होते आणि शेतकरी स्त्रीपुरुष इकडून तिकडे फिरत होते. प्रदर्शनांत खेडूत स्त्रियांनीं केलेल्या विणकामाचे नमुने, खेड्यांतल्या चांभारांनीं केलेल्या चपला, जोडे, मातीचीं भांडीं वगैरे होतींच; पण चांगल्या बीबियाण्याचे, खतांचे, औत

अवजारांचेहि नमुने होते. उत्कृष्ट जातीच्या बैलांचें बीज घेऊन कृत्रिम उपायांनीं गुरांची पैदास कशी सुधारावी हें सांगण्याकरतां आपल्या साधनांसह एक शीख पशुडॉक्टरहि प्रदर्शनांत होते. शेतकरी स्त्रियांना बाळंतपण, शिशुसंगोपन, वगैरेंची माहिती देणारी एक पोरगेलीशी, चुणचुणीत पंजाबी नर्सहि होती.

प्रदर्शन पाह्यला आलेल्या तरुणवृद्ध शेतकऱ्यांना आम्हांला कांहीं प्रश्न विचारावयाचे आहेत असें आम्ही म्हटलें, तेव्हां तिथला तरुण ग्रामसेवक धरमसिंग यानें तिथेंच शेतकऱ्यांना बोलावून एक लहानशी सभा घेतली. आमच्यांतल्या हिंदी जाणणारांनीं शेतकऱ्यांना उलटेसुलटे प्रश्न विचारले. विकासप्रकल्पांमुळें फायदा होतो आहे हें कुणीच अमान्य केलें नाहीं. एक धिप्पाड, पांढरेशुभ्र केंस झालेला म्हातारा शेतकरी म्हणाला, "साहेब, माझ्या तरुणपणीं या जेमतेम चारशें माणसें असलेल्या खेड्यांत साऱ्या गांवाचें पीक दोनशें मणांचें नव्हतें; आतां एकदोन घरें अशी आहेत कीं त्यांचें स्वतःचें पीक दोनशें मणांवर आहे!"

ग्रामसेवक धरमसिंग म्हणाला, "या खेड्यांत दोन वर्षांपूर्वी मी आलों तेव्हां मला राह्यला कुणी जागा देईना. देवळांत राह्यलों! समाजविकास, ग्रामसेवक हें सगळेंच कांहीं खेडुतांना नवीन होतें. सरकारचें कांहीं तरी आहे म्हणजे खेडुतांना सशयच येई."

रायपूर आणि अर्जादेरि या दोन खेड्यांना भेट देऊन आम्ही परत फिरलों. शिवणकाम शेतकरी स्त्रियांना शिकवण्याचा एक फिरता वर्ग विकासगटातर्फे खेड्याखेड्यांत चालविला जातो. प्रत्येक खेड्यांत शिवण्याचीं यंत्र घेऊन शिवण शिक्षिका कांहीं दिवस मुक्काम करतात. असला एक वर्ग आम्ही रायपूर खेड्यांत पाहिला. आम्ही आंत गेल्याबरोबर मास्तरणीखेरीज इतर स्त्रियांनीं आपल्या रंगीबेरंगी ओढण्या भर्कन् तोंडावर ओढल्या! अर्जादेरि खेड्याची एकंदर लोकसंख्या फक्त एकशें तेरा आहे. बहुतेक सर्व गांवच आम्हांला भेटलें म्हणायला हरकत नाहीं. तळ्याच्या कांठीं एका पिंपळाखालीं कांहीं गांवकऱ्यांनीं आम्हांला खड्या सुरांत भजनें म्हणून दाखविली, दोन तलवारी एकमेकांना जोडाव्या तसें कांहींतरी वाद्य एक जण भजनाबरोबर चिपळीसारखें वाजवीत होता.

दुपारीं नीलोखेरींतील विकास कार्यकर्ते तयार करण्याचीं निरनिराळीं केंद्रें पहाण्याचा कार्यक्रम होता.

पहिल्यांदा भारत सरकारच्या माहितीखात्याचें केंद्र पाहिलें. तिथें भारताच्या निरनिराळ्या भागांची माहिती देणारीं निरनिराळ्या मापांतलीं पत्रकें आणि सचित्र पुस्तिका होत्या. तिथून नीलोखेरींतील फार महत्त्वाची संस्था म्हणजे 'एक्स्टेन्शन ट्रेनिंग सेंटर'—राष्ट्रीय विस्तार शिक्षण केंद्र, किंवा ग्रामसेवक तयार करण्याचें केंद्र पहावयास गेलों. भारतांतल्या बहुतेक राज्यांत अशीं केंद्रे आहेत. पण ज्या राज्यांत नाहींत त्यांच्यासाठीं भारत सरकारनें हें केंद्र नीलोखेरींत चालवलें आहे. प्रिन्सिपॉल सिंग आणि त्यांचे सहकारी यांनी केंद्राचे सर्व विभाग आम्हांला दाखवले. मराठी पद्धतीनें काचा मारून धोतर नेसलेले, वर लांब रेशमी झब्बा घातलेले, दणकट बांध्याचे, वर्णानें काळे, पन्नाशी उलटून टक्कल पडलेले प्रि. सिंग आमच्याकडले देशस्थ ब्राह्मण तर नसावे ना असें पहिल्यांदा मला वाटलें. पण ते पंजाबीच असल्याचें नंतर कळलें.

काश्मीर—जम्मू मधले ९२ तरुण केंद्रांत ग्रामसेवकांचें काम शिकत होते. अभ्यासक्रम एक वर्षाचा असतो. सरकारकडून महिना ५० रुपये खर्चासाटीं मिळतात. नंतर आपल्या राज्यांतल्या कोणत्याहि खेड्यांत जाऊन तिथल्या लोकांत मिसळून रहावयाचें; आणि नव्या पद्धतीची शेती, खतें, आरोग्य, स्वच्छता वगैरे बाबतींत गावकऱ्यांना मार्गदर्शन करावयाचें. ७०–८० रुपये ग्रामसेवकांचा पगार असतो. लोकसेवेची इच्छा आणि या कामाची आवड असल्याशिवाय या कामांत कुणी पडणार नाही.

केंद्रांतल्या विद्यार्थ्यांची झोपायची लांबच लांब खोली पाहिली. दोन्ही भिंतींना लागून रांगेनें खाटा होत्या. खाटेवर निळी चादर होती. उशाकडे एक एक फावडें होतें.

"हें फावडें म्हणजे ग्रामसेवकाचें भूषण," सिंग म्हणाले, "पहांटेपासून दुपारपर्यंत यांच्याकडून मी भरपूर काम करून घेतों, पण खाणेंपिणें, खेळ यांची मात्र त्यांना मुळींच हयगय करूं देत नाहीं. इथे आलेल्या मुलाचें बाहेर पडतांना वजन वाढलेलेंच असलें पाहिजे. रोज त्यांना सकाळीं दूध घ्यायला लावतों. कांहींच्या घरची फार गरिबी असल्यामुळें दूध वगैरे न घेतां पन्नास रुपयांतले कांहीं पैसे वांचवून घरीं पाठवायला ते पाहातात; पण मी त्यांना तसें करूं देत नाहीं."

केंद्रांत काम करणाऱ्या प्रि. सिंग यांच्या एका सहकाऱ्यानें विद्यार्थ्यांकरतां केंद्रांत असलेलें कायमचें प्रदर्शन आम्हाला दाखविलें. या प्रदर्शनांत खेड्यांतल्या

आदर्श विहिरींचें, संडासांचे छोटे छोटे नमुने होते. आरोग्यविषयक मोठमोठीं रंगीत चित्रेंहि भितीवर लावलेली होतीं. शेतीच्या अवजारांचेहि नमुने होते.

इथून समाजशिक्षण केंद्रांत आलो. नागपूरकडले श्री. ताम्हने या केंद्रात प्रमुख आहेत. त्यांनीं मोठ्या उत्साहानें आम्हांला सर्व माहिती दिली.

"खेड्यांतल्या माणसाला खाणेंपिणें, कपडालत्ता चांगला मिळायला हवा, त्याचप्रमाणें खरा जीवनानंद चाखण्याकरतां त्यांच्या सौंदर्यदृष्टीचाहि विकास व्हायला हवा," ते म्हणाले, "म्हणूनच मातीचीं सुंदर भांडीं कशी करावीं, त्यांच्यावर रंगीबेरंगी आकृत्या किंवा वेलबुट्टी कशी काढावी, घराच्या साध्या भिंतीहि सुंदर कशा करतां येतील हेंहि त्यांना समजायला हवें."

या केंद्रांत शिक्षण घेणाऱ्या समाजशिक्षणाधिकाऱ्यांना या दृष्टीनें तयार करण्यांत येतें. केंद्रांतली निरनिराळ्या आकारांचीं आणि रंगाचीं सुंदर सुंदर मातीचीं भांडीं, सुबक नक्षीकाम केलेल्या कातड्याच्या पिशव्या, खेडुत मुलांचें रंगकाम वगैरे आम्हाला श्री. ताम्हने यांनीं दाखवलें.

संध्याकाळीं गेस्ट हाऊसच्या हिरवळीवर नीलोखेरींतल्या अधिकाऱ्यांनीं आम्हांला एक चहापार्टी दिली. तिथें प्रख्यात गांधीवादी अर्थशास्त्रज्ञ डॉ. जे. सी. कुमाराप्पा भेटले. ते कट्टर गांधीवादी आहेत. काचा मारलेलें खादीचें धोतर, खादीचा लांब सदरा, गांधी टोपी, आणि अर्ध्या पिकलेल्या केसांची त्रिकोणी दाढी—त्याचें व्यक्तित्व प्रभावी आहे. उत्कृष्ट इंग्रजींत संथपणें ते बोलतात. राक्षसी यंत्रीकरणावर त्यांचा भारी राग. "भाकऱ्याचं प्रचंड धरण बघायला तुम्ही जाणारच असाल ?" आम्हांला ते म्हणाले.

आम्ही "हो" म्हणालो.

तेव्हां ते म्हणाले,

"आपल्या दक्षिणेकडे सहाशें सातशें वर्षांपूर्वी पांड्य राजांच्या काळांत लहान लहान धरणें बांधून मोठमोठे तलाव बांधले होते. या तलावांत पुराचें पाणी सांठत असे, आणि शेतकऱ्यांना त्याचा भरपूर उपयोग होई. हे जुने तलाव थोडे दुरुस्त केले तर अन्नाचें उत्पादन तिप्पट करतां येईल. पण तिकडे कुणी लक्ष देत नाहीं; आणि कोट्यवधि रुपयांचीं प्रचंड नवीं धरणें एकामागून एक होताहेत! विजेचें प्रचंड उत्पादन, प्रचंड कारखाने, प्रचंड स्पर्धा आणि प्रचंड बेकारी ! ठीक आहे. आमचं ऐकतो कोण ? सरकारलाहि आम्ही

नको आणि लोकांनाहि नको!"

"राज्यपुनर्रचनेबाबत तुम्हांला काय वाटतं, डॉक्टर?" आम्ही विचारलें.

"वकील लोक आणि कायदेमंडळाचे सभासद्—म्हणजेच सुशिक्षित बेकार —यांना भाषावार प्रांत हवे आहेत," कुमाराप्पा उद्गारले, "बिचाऱ्या गरीब जनतेचा त्यांत कांहींच फायदा नाही. देशाचे विभागच करायचे तर नद्यांच्या खोऱ्यांना धरून करायला हवेत. नद्यांचीं खोरीं ही सुधारणा आणि संस्कृतीचीं उगमस्थानें असतात. भारतांतल्या बहुतेक नद्या पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहतात. बहुतेक डोंगर पश्चिमेकडेच आहेत. तेव्हां एक एका नदीच्या खोऱ्याचा एकएक घटक करावा. नदीच्या पाण्याचे लहान लहान धबधबे असतात. त्यांचा उपयोग करून छोटीछोटी वीजनिर्मितीचीं केंद्रें करावीं. त्या विजेवर खेड्यांतले छोटेछोटे उद्योग चालवावे आणि खेडीं स्वयंपूर्ण करावीं."

रात्र बरीच झाली होती. कुमाराप्पांचे आभार मानून आम्ही आमच्या निवासस्थानीं परत आलो; आणि जेवणं उरकून रात्रीच्या गाडीनं पुढं जाण्याकरतां नीलोखेरीचा निरोप घेतला.

—सुगंध, दिवाळी १९५६

# सतलजचें पाणी

सतलज, चिनाब, बियास, झेलम, रावी ही नांवें लहानपणीं गाण्यांतल्या एखाद्या मंजुळ ओळीसारखीं आम्ही गुणगुणत असूं; आणि भूगोलाच्या पुस्तकांत पाहिलेल्या पंजाबांतल्या या पांच नद्यांचीं चित्रं डोळ्यापुढें रंगवीत असूं. त्यानंतर इतिहास वाचूं लागलों. वेदांतल्या ऋचा आर्य ऋषिवर्यांनीं याच नद्यांच्या काठीं रचल्या आणि गाइल्या, हें कळलें तेव्हांपासून तर या नांवांचें भलतेंच गूढ आकर्षण वाटूं लागलें. पंजाबची भूमि सुजलासुफला करून टाकणाऱ्या या महान् नद्या आपल्याला कधीं पाहायला मिळतील काय, असें मनाला वाटे.

### *लोकमातांच्या कपाळीं राजकारण*

सोन्यासारख्या मुलायम मातींतून सोन्यासारखा गहूं, हरभरा देणाऱ्या पंजाबच्या भूमीचे दोन तुकडे झाले. एक तुकडा पाकिस्तानांत गेला आणि एक तुकडा भारतांत राहिला. या नद्यांच्या प्रवाहांचेहि कांहीं तुकडे भारतांत आले, तर कांहीं पाकिस्तानांत गेले. आपल्या प्रदेशांतल्या प्रवाहांना धरणें बांधून, भारत आमचा पंजाब शुष्क करूं पाहतो आहे, अशी पाकिस्तानची तक्रार—तर भारतीय पंजाबांतले कालवे कोरडे पाडण्याचा उद्योग आपल्याकडले प्रवाह अडवून पाकिस्ताननें चालविला आहे असें भारताचें म्हणणें. एका पंजाबचे दोन पंजाब झाल्यामुळें या लोकमातांची अशी ओढाताण चालली आहे; आणि त्यांची ही विटंबना जागतिक लवादापर्यंत जाऊन पोहोंचली आहे. लोकमातांना भूगोल आणि इतिहास माहीत होता, पण आपल्या कपाळीं राजकारण येईल याची त्यांना कल्पनाहि नसेल!

भूगोल, इतिहास आणि राजकारण यांच्या रंगछटांनीं अशा तऱ्हेनें गूढरम्य झालेल्या वातावरणांत गुरफटलेल्या या नद्यांपैकीं सतलज किंवा वैदिक ऋषींची शतद्रु, बियास आणि रावी या नद्या पाहण्याची संधि भारत सरकारनें विकास-योजना दाखविण्याकरितां लेखक पत्रकारांना नेलें तेव्हां मिळाली. अंबाला स्टेशन रात्रीं साडेअकराला आम्हीं सोडलें. पहाटे साडेसातच्या सुमाराला आम्ही 'आनंदपूरसाहेब' या स्टेशनांत येऊन पोहोंचलों. भाक्रानंगल धरणाचे प्रचंड बांधकाम सुरू झाल्यापासून नंगल नांवाचें एक नवीनच नगर उभें करण्यांत आलें आहे, आणि रेल्वेचा फाटा तेथपर्यंत नेला आहे. गाडी आनंदपूरसाहेबहून पुढे नंगललाच जाणार होती. आमचा मुक्काम नंगलमधल्याच सरकारी फील्ड् होस्टेलमध्यें होणार होता. तेथूनच सतलजवरली भाक्रा-नंगल धरणें पाहायला आम्ही जाणार होतो. आनंदपूरसाहेबहून नंगलपर्यंत मोटाररस्ता आहे. या रस्त्यावर नंगलच्या धरणानें अडविलेल्या सतलजच्या पाण्यावर चालणारी दोन प्रचंड वीज-उत्पादन केंद्रें—कोटला आणि गंगुवाल—आहेत, तीं आम्हांला पाहावयाचीं होतीं. स्टेशनाच्या नांवापुढें 'साहेब' लावलेलें पाहून आश्चर्य वाटलें होतें; पण नंतर कळलें कीं, शीखांचे गुरु नानक यांचा या गांवाशीं संबंध आल्यामुळें शीख लोक हें गांव अत्यंत पवित्र समजतात. कोणत्याहि पवित्र गोष्टीला शीख 'साहेब' म्हणतात. आपल्या पवित्र ग्रंथालाहि ते 'ग्रंथसाहेब' म्हणतात. भाक्रा-नंगल धरण-योजनांचे संपर्काधिकारी आम्हांला नेण्याकरिता मोटारी घेऊन स्टेशनांत आलेच होते.

### *कोटला व गंगुवाल येथील वीजकेंद्रें*

कोटला पॉवरहाऊसच्या बाजूच्या टेकाडावर सुंदर बागबगीचानें वेढलेलें सरकारी रेस्टहाऊस आहे. रेस्टहाऊसच्या बागेतून अठरा मैलांवरल्या नंगल येथून आणलेल्या सतलजच्या कालव्याचें पाणी तीन प्रचंड पायऱ्यांवरून धबधब्यासारखें फेसाळत उड्या मारतांना दिसतें. या पाण्यावरच कोटलाचे टर्बाइन्स फिरतात, आणि २४००० किलोवॅट वीज तयार होते. रेस्टहाऊसमध्यें प्रातरुपाहार घेऊन कोटलाचें पॉवरहाऊस पाहावयाला गेलों. दोन प्रचंड जनरेटर सध्यां चालू आहेत. तिसऱ्याची जागा रिकामी आहे. तो लवकरच येईल. तेथल्या इंजिनियरांनीं लाल-हिरव्या सुपारीएवढ्या दिव्यांनीं भरलेलीं वीज-

नियंत्रणाचीं यंत्रे आणि या केंद्रांतून कुठे कुठे वीज जाते तो नकाशा दाखवला. कोटलाचे वैशिष्ट्य हें कीं, येथून सहा मैलांवर असलेल्या दुसऱ्या गंगुवाल या वीजकेंद्रांतून येथल्या यत्रांचें नियंत्रण करतां येतें. कोटला येथें निर्माण झालेल्या विजेचा हिशेब गंगुवाल येथील फलकावरील यंत्र बरोबर दाखवितात. धबधब्याचें पाणी जेथें टर्बाइन्सवर पडून तीं फिरतात, तो पॉवरहाऊसचा भाग नदीच्या पात्राखालीं दोन मजले खोल आहे. भुयारातल्याप्रमाणें जिने उतरून या मजल्यावर जातां येते. दोन्ही भूमिगत मजल्यावर निरनिराळीं यंत्रे आहेत. हीं यंत्रे पाहून आम्ही वर आलो, आणि सहा मैलांवर असलेल्या गंगुवालकडे आमच्या मोटारी वळल्या. गंगुवाल कोटलासारखेंच आहे. येथून नंगल बारा मैल आहे. नंगलहून भाक्रा धरण जेथें बांधलें जात आहे ती दरी सात मैल आहे. भाक्रा येथें चाललेल्या प्रचंड उद्योगाला आवश्यक असलेली वीज गंगुवाल पॉवर हाउस पुरवितें. गंगुवाल पाहून आम्ही थेट नंगलला गेलों.

जगातलें एक प्रचंड धरण भाक्ऱ्याला बांधलें जात आहे. या धरणाची पूर्व-तयारी १९४८ पासून चालू झाली. पण धरणाच्या कामाला प्रारंभ १९५५ च्या नोव्हेंबरात झाला आणि साडेतीन वर्षांत हें धरण पुरें होणार आहे. ३०० इंजिनिअर, २००० इतर अधिकारी आणि ७००० मजूर आठ आठ तासांच्या तीन पाळ्या करून रात्रंदिवस साडेतीन वर्षे खपणार आहेत. हे नऊदहा हजार लोक, आणि इथल्या यंत्रांच्या दुरुस्तीकरितां किंवा मोठमोठ्या पोलादी यान्त्र्या जोडण्याकरितां उभारलेल्या कारखान्यांत कामें करणारे चार-पांच हजार लोक मिळून पंधरा हजार लोकवस्तीसाठीं नंगल हें नवेंच नगर, भाक्ऱ्याच्या चिंचोळ्या दरीतून बाहेर पडलेल्या सतलजच्या काठीं वसविण्यांत आलें आहे. बड्या पाहुण्यांसाठीं नदीच्या एका वळणावर रंगीबेरंगी फुलांच्या ऐसपैस बागा आवती-भोंवती असलेले एक-दोन सुसज्ज बंगले आहेत. गांवांत एक लहानसा बाजार आणि बराकींसारखीं विटांचीं घरें आहेत. शाळा, दवाखाना, इस्पितळ वगैरे भरपूर मोकळ्या जागेत आहेत. भाक्ऱ्याच्या मानानें अगदींच लहान म्हणजे ९५ फूट उंचीचें एक धरण सतलजला नंगल येथें बांधलें आहे. येथें पाणी अडवून जो कालवा काढला आहे, त्याचेंच पाणी गंगुवाल आणि कोटला येथील वीज-केंद्रांचीं टर्बाइन्स चालवतें. दोनशें मैलांवर असलेल्या दिल्ली शहराला गंगुवाल केंद्रच वीज पुरवितें.

### मनाला गुदगुल्या करणारी कल्पना !

संध्याकाळीं नंगलचें धरण पाहायला गेलो. नदींत धरणे बांधायचीं म्हणजे प्रवाहाचा जोर सहन करण्याकरिता त्यांचा पाया नदीच्या पात्राखालीं शंभर ते दीडशें-दोनशें फूट दगड फोडून घालावा लागतो. नंगल धरणाचा पाया सतलज नदीच्या प्रवाहाखाली ७० फूट आहे, तर भाक्राचा १५० फूट आहे. धरण दाखविणाऱ्या इंजिनिअरांनीं धरणाच्या एका टोकाला असलेल्या भव्य आणि आरामशीर लिफ्ट्मध्यें आम्हा चौदा-पंधरा जणाना उभे करून पृथ्वीच्या पोटांत नदीच्या पात्राखाली ७० फूट खोल—म्हणजे एखाद्या इमारतीचे पांचसहा मजले होतील इतकें खोल नेले ! धरणाच्या भूमिगत पायात चागले १० फूट उंचीचे आणि ५-६ फूट रुंदीचे,—सिमेंटचा गिलावा केलेले आणि विजेच्या दिव्यांनीं प्रकाशित केलेले कांहीं फर्लांग लांबीचे आडवेतिडवे बोगदे होते. यांना 'इन्स्पेक्शन गॅलरीज' म्हणतात. धरणाची मजबुती पहाण्याकरितां या बोळांतून किंवा बोगद्यांतून इंजिनिअराना फिरतां येतें. भूगर्भातलें पाणी धरणाचा पाया ढिला करील म्हणून ते पंपानें वर घेऊन नदीच्या पाण्यांत नेऊन सोडण्याची व्यवस्था या बोगद्यांत केलेली असते. हे भूगर्भातलें पाणी ठिकठिकाणीं आम्हांला दिसलें. तें स्फटिकासारखें स्वच्छ आणि थंडगार पाणी चाखून पाहातां फारच चवदार वाटलें. सतलजसारखी एक महान् नदी वरून वाहात आहे आणि तिच्या पात्राखाली १०० फूट जागेत आपण फिरतो आहोत ही कल्पना मनाला कांहीं विलक्षण गुदगुल्या करीत होती. इंजिनिअरांच्या कर्तृत्वाचेंहि कौतुक वाटत होतें.

धरण पाहिल्यावर गांवांत एक फेरी मारली. नगल गाव स्वच्छ आणि मोकळें वाटतें, पण जुन्या गांवाचा प्रौढपणा त्यांत दिसत नाही. नदीच्या काठीं एक गुरुद्वार आणि एक देऊळ आहे. तीं नवीं कोरींच आहेत. गुरुद्वाराचा कांही भाग तर अजून बांधून व्हायचा आहे. लांबून मशिदीच्या घुमटासारखे दोन घुमट आणि एक कळस दिसत होता. पण येथे मशीद एकहि नाहीं. उंचावर दिसत होता तो गुरुद्वाराचा घुमट होता. दुसरा घुमट 'सनातन धर्मसभे'च्या धर्मशाळेचा होता. धर्मशाळेच्या आवारांत लक्ष्मीनारायणाचें मंदिर आहे. कळस त्याच मंदिराचा होता. मंदिराजवळ दोन खोल्यांच्या जागेत 'सनातन धर्मसभे' चें वाचनालय आहे. तेथें पंजाबी, हिंदी, पुस्तकें किंवा हिंदी, इंग्रजी वृत्तपत्रें वाचीत बसलेले दोघे-तिघे दिसले. नंगल रेल्वे-स्टेशन चिमुकलेंच पण वैशिष्ट्यपूर्ण आहे.

ायऱ्या चढून स्टेशनच्या इमारतींत जावें लागतें. पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना तलजमधले पांढरे, तांबूस, पिवळे मोठमोठे भोपळ्याएवढे गोटे एकावर एक चून लावले आहेत. नंगलमध्यें कुठेंहि गेलें तरी सतलजला विसरतां येत नाहीं.

## ाक्रा धरणाचें अतिप्रचण्ड स्वरूप

दुसऱ्या दिवशीं सकाळींच भाक्रा पाहायला मोटारींतून निघालो. सहा-सात लांचेंच अंतर, पण एकदोन छोटे घाट चढून उतरावे लागतात. धरणाच्या ागीं आल्याबरोबर दूर अंतरावर हिमालयाच्या रांगांतले दोन प्रचंड कडे आणि ड्यांच्या मधल्या जागेत अजस्र पोलादी खांबाच्या जाळ्यांतून इकडेतिकडे फेरणाऱ्या राक्षसी याऱ्या दिसूं लागतात. चुकून सुरुंगानें उडालेल्या दगडांनीं ोकें फुटूं नये म्हणून पांढरा रंग दिलेल्या टिनच्या टोप्या घालून फिरणारे ंजिनियर आणि कामगार ठिकठिकाणीं कामें करीत होते. या दोन कड्यांच्या धल्या अगदीं चिंचोळ्या दरींतून सतलज बाहेर पडते. उन्हाळ्यांत हिमालयाचें र्फ वितळून नद्यांना पूर येतात, तेव्हां सतलजचें ९० टक्के पाणी समुद्रांत फुकट ातें. तेव्हां या चिंचोळ्या जागेत धरण बांधून लाखो एकर जमिनीला पाणी ुरविण्याची आणि विजेचें उत्पादन करण्याची कल्पना पन्नाससाठ वर्षांपूर्वीच ब्रिटिश इंजिनियरांना सुचली होती. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर १९४८ सालीं तिला मूर्त वरूप आलें; आणि नंतर सात वर्षांनीं धरणाच्या कामाला सुरुवात झाली.

भाक्रा धरणाचें सर्वच कांही प्रचंड आहे. सरळ उंचीचें (म्हणजे स्ट्रेट ंव्हिटीचें) जगांतलें सर्वांत उंच धरण हें होणार आहे. याची उंची जवळजवळ ०० फूट म्हणजे कुतुबमिनारच्या तिप्पट होणार आहे. कड्यांमधल्या दरीचा ाकार इंग्रजींतल्या 'व्ही' अक्षरासारखा आहे. तेव्हां दोन कड्यांमध्यें पायाकडे ५० फूट आडवें हें धरण होईल, तर शेंड्याकडे १७०० फूट होईल. या रणाची जाडी पायाकडे १३०० फूट असेल; तर शेंड्याकडे फक्त ३० फूट. या ० फूट जाडीच्या आणि १७०० फूट लांबीच्या टोकावरून इकडून तिकडे ायला उत्तम मोटार-रस्ता तयार करण्यांत येईल. रात्रंदिवस साडेतीन वर्षें ा धरणांत ताशीं ४०० टन सिमेंट—कॉंक्रीट ओतलें जाणार आहे. इंजिनि- रांच्या मतें येथें साडेतीन वर्षांत ओतल्या जाणाऱ्या सिमेंटांत पृथ्वीभोंवती ्षुववृत्ताचा जो पट्टा आहे त्या सबंध पट्टयावर आठ फूट रुंदीचा सुंदर रस्ता

होऊं शकेल! भाक्रा—नंगल एकंदर योजनेचा खर्च १७० कोटि रुपये होईल. धरणाच्या दोन्ही बाजूना दोन प्रचंड वीज-केंद्रें, आठ फूट रुंदीच्या वीस आणि पंधरा फूट रुंदीच्या दहा मिळून तीस प्रचंड बोगद्यांतून सोडलेल्या पाण्यावर चालतील. तीं साडेतीन लक्ष किलोवॅट वीज निर्माण करतील. ही धरणयोजना पुरी झाली कीं ७०० मैल लांबीचा मुख्य कालवा आणि त्याच्या एकंदर ४००० मैल लांबीच्या लहानमोठ्या शाखा मिळून पंजाब, पेप्सु आणि रेताड राजस्तान या प्रांतांच्या अदमासें साठ लक्ष एकर जमिनीला पाणी मिळेल. अन्नोत्पादन वर्षाकाठीं दहा लक्ष टनांनीं वाढेल. पांच लक्ष गांठी कापूस अधिक पिकेल आणि दीड लाख टन उंसाचें पीक अधिक येईल. याशिवाय लहानमोठ्या उद्योगधंद्यांची वाढ होईल, तें वेगळेंच. एक इंजीजिनिअर म्हणाले, "या धरणाच्या प्रचंड पणाची कल्पना येण्याकरतां एक गोष्ट सांगतो ती लक्षांत ठेवा—या धरणाच्या पोटांत एक लक्ष खोल्या असलेली साठ मजल्यांची गगनचुंबी इमारत सहज मावूं शकेल."

एका प्रख्यात अमेरिकन इंजिनिअरच्या सल्ल्यानें काम चाललें आहे. पण प्रत्यक्षपणें कामें करणारे सर्व इंजिनिअर हिंदीच आहेत. 'मुख्य अडचण म्हणजे,' इंजिनिअरसाहेब म्हणाले, 'हिमालय हा जगांतला सर्वांत उंच पर्वत असला तरी जगातल्या अगदीं तरुण पर्वतांपैकीं तो एक आहे—अरवलीसारखा तो बुढ्ढा नाहीं. त्यामुळें हा खडक फार ठिसूळ आहे. एक फूट खोदलें तर तीस फूट कोसळून पडतात. धरण मजबूत व्हावें म्हणून खडकाला भोकें पाडून हजारों टन सिमेंटचीं इंजेक्शनें आम्हाला त्याला द्यावीं लागतात!'

## *सतलजमधलेच गोटे आणि सतलजमधलीच रेती*

धरणाचा पाया घालायचा म्हणजे नदीचा प्रवाह बाजूला करून मधलें पात्र सुकें ठणठणीत करावें लागतें. त्याकरतां इंजिनियरांनीं एक युक्ति केली. दोन बाजूंच्या दोन कड्यांना आरपार भोकें पाडून चार चार कोटि रुपये खर्च करून दोन बोगदे केले. जेथें धरण व्हायचें त्याच्या वरच्या बाजूला मातीचें एक तात्पुरतें धरण बांधलें. त्याला कॉफर डॅम् म्हणतात. असेंच एक धरण कड्यांच्या बाजूला बांधलें. नदीचा प्रवाह वरच्या धरणानें दुभंग होऊन दोन बोगद्यांत शिरला, आणि खालच्या धरणाच्या पलीकडे उघडणाऱ्या बोगद्यांच्या दोन तोंडांवर

बाहेर पडून एक झाला, आणि पुढें जाऊं लागला. मातीच्या दोन धरणांमधील दरींतली जागा कोरडी झाली. इथेंच कुतुबमिनारच्या तिप्पट उंचीवर पोलादी खांबांवरून अजस्र यान्या इकडून तिकडे फिरतात आणि लाखो टन कॉक्रीट, कोरड्या झालेल्या खालच्या भयानक दरींत ओतलें जातें. जीपगाड्या कड्याच्या माथ्यावर जाऊं शकतात. तिथूनच पलीकडे दुभंग होऊन दोन बोगद्यांत शिरलेला आणि मधली कोरडी जागा सोडून अलीकडे पुन्हा एक होऊन फेसाळत पुढें चाललेला सतलजचा प्रवाह आम्ही पाहिला. दरीच्या तळाशी काम करणारीं माणसें गलिव्हरच्या लिलिपुटियनसारखीं हाताच्या अंगठ्याएवढी दिसत होतीं !

सिमेंटांत मिसळण्याकरिता लागणारी रेती आणि दगड, धरणाच्या ठिकाणाहून चार मैलांवर सतलजच्याच कांठीं असलेल्या नेह्ला आणि फत्तेवाला या गांवांहून येतात. चार मैल लांबीचा—अर्थात तुकडे जोडून केलेला—दीडदोन इंच जाडीचा आणि हात–दीड हात रुंदीचा एक रबराचा पट्टा—बेल्ट् कन्व्हेअर—या गावांहून भाक्रयापर्यंत, विजेच्या तारांचे असतात तशा खांबांवरून आणला आहे. तो चोवीस तास खड् खड् खड खड करीत विजेच्या शक्तीनें फिरत असतो. नेह्ला—फत्तेवालमध्यें सतलजमधली रेती आणि लहान मोठेगोटे यंत्राच्या साहाय्यानें आपोआप काढले जातात; आणि या पट्ट्यावर ठेवले जातात. भाक्रयाला आले कीं लहानमोठे गोटे आपोआप वेगळे होऊन रेतीसह सिमेंटांत जाऊन पडतात. प्रचंड रेफ्रिजरेटरमध्यें हें मिश्रण जातें, ठराविक वेळ थंडगार होतें आणि तोललें जाऊन खाली उभ्या असलेल्या छोट्या रेल्वेच्या डब्यांत पडतें. डबा पुढें सरकतो. रिकामा डबा खाली येऊन उभा राहतो. पुढें सरकलेला सबंध डबा यारी उचलून घेते, आणि कॉक्रीट खाली ओततें. रिकामा डबा खाली आपल्या चौकटीवर येऊन बसतो, आणि गाडी पुनः परततें. असें हें चोवीस तास चालू असतें. बारा मालगाड्या आणणार नाहीत एवढा माल हा रबरी पट्टा दररोज आणतो; आणि माल ओतणें, मिसळणें, वजन करणें हीं हजारों मजुरांचीं कामें यंत्रें करतात ! एका खोलीत सर्व यंत्रांचीं बटणें आहेत. इथली बटणें दाबून हा अजस्र कारभार रात्रंदिवस चालू ठेवतां येतो. ही खोली इंजिनिअर आम्हांला दाखवीत होते, आणि आम्ही त्यांच्याकडून बटणांकडे आणि बटणांकडून त्यांच्याकडे टकमकां पाहत होतो ! सतलजमधलेच गोटे आणि सत-

लजमधलीच रेती घेऊन सतलजला अडवायची,—याचें सतलजला काय वाटत असेल कुणाला ठाऊक!

भाक्र्याहून सतलज नदी खाली फिरोजपूरकडे जाते तेथेंहि एक मोठें धरण बांधून कालवे काढलेले आहेत. पण फिरोजपूरला पोहोचण्यापूर्वी पाकिस्तानांत एक मोठी चक्कर मारून सतलज फिरोजपूर येथें भारतांत येते. पाकिस्तानांत तिचा प्रवाह अडवला जाण्याची आणि फिरोजपूरचे कालवे कोरडे पडण्याची भीति होती म्हणून मोगा तहसिलींत हिराके येथें—बियास सतलजला मिळते आणि दोघींचा एकत्र प्रवाह होतो,—त्या जागी सहा कोटि रुपये खर्च करून एक दुमदार धरण बांधण्यात आलें आहे. या धरणावरून सुंदर मोटाररस्ता आहे. या रस्त्यावर उभे राहून सतलज-बियासचा भव्य संगम डोळे भरून पाहता येतो. सतलज पाकिस्तानांत शिरण्याआधींच हिराके येथें तिला अडवून दोन कालवे काढण्यात आले आहेत. एक कालवा फिरोजपूर येथें जातो. पाकिस्ताननें आपल्या प्रदेशांत सतलजच्या पाण्याशीं गडबड केली तरी या कालव्यातून सरळ फिरोजपूरला पाणी जाईल. दुसरा कालवा राजस्थानला जाऊन पोहोचणार आहे. पण सध्या जागतिक बँकेच्या लवादापुढें नद्यांचें भांडण भारत पाकिस्ताननें नेलेलें असल्यामुळें हा कालवा खुला केलेला नाहीं.

## नद्यांना राजकारण कळत नाहीं

रावीचा प्रवाह तर इतर कांही ठिकाणीं अर्धा भारताचा आणि अर्धा पाकिस्तानचा आहे! 'डेराबाबा नानक' हे अमृतसरपासून चाळीसपन्नास मैलांवर पाकिस्तानच्या सीमेला लागून आहे. आगगाडी डेराबाबा नानकाच्यापुढें जात नाहीं. पूर्वी अखंड भारतात सियालकोटला जाणारी गाडी डेराबाबा नानकजवळ रावी नदीवर जो पूल आहे त्याच्यावरून जात असे. आता हा रस्ता बंद आहे. जवळचीं गांवें पूर आला म्हणजे बुडूं नयेत म्हणून या पुलाच्या खालीं नदीच्या काठीं भारतीय इंजिनिअर प्रवाहांत दगडमातीचीं लहानलहान टेकाडें उभीं करून प्रवाहाला बाजूला हालवीत आहेत. पाकिस्तानची याविरुद्ध तक्रार आहे. रावीवरल्या पुलाच्या एका टोकाला भारतीय सैनिक, रणगाडे, यंत्रसज्ज तोफा वगैरे घेऊन ठाण माडून बसले आहेत, तर दुसऱ्या टोकाला पाकिस्तानी सैनिक तशाच

तयारींत बसलेले दिसतात. पुलाच्या मधोमध एक पत्र्याचा बाण उभा केला आहे. तेथें पांढरीं निशाणें घेऊन जरूर पडल्यास दोन्ही बाजूचे अधिकारी भेटतात, आणि बोलणीं करतात! दुसऱ्या एका ठिकाणीं रावीवर असेंच काम चालू होतें. अलीकडल्या कांठावर आपल्या सैनिकांची गस्त चालू होती, तर पलीकडल्या कांठावर पाकिस्तानचे सैनिक संगिनी सरसावून फिरत असलेले दिसले!

रावी नदी कित्येकदां प्रवाह बदलते, आणि कधीं पाकिस्तानचा कांही प्रदेश भारतांत येतो तर भारताचा पाकिस्तानांत जातो! नद्यांना राजकारण कळत नाही, त्याचा हा परिणाम!

—सह्याद्रि, एप्रिल १९५७

# आजची गंगा—आजचे भगीरथ

आपल्या हजार पूर्वजांच्या अस्थि पवित्र करण्याकरितां भगीरथानं कुणी कधीं केले नव्हते किंवा कुणी कधीं करणार नाहीं असे प्रयत्न करून स्वर्लोकातली गंगा भूलोकांत आणली. अस्थि पवित्र झाल्या आणि त्यांच्या हजार ज्योति होऊन त्या स्वर्लोकाला गेल्या. भगीरथाच्या पूर्वजांना स्वर्ग मिळाला. ही झाली पुराणातली कथा. पण भूलोकाचा स्वर्लोक करूं पहाणाऱ्या दुसऱ्या भगीरथाची कथा सांगण्यासारखी आहे. ही कथा अगदीं आजकालची, फक्त शंभर वर्षांपूर्वीची आहे; आणि गंगेच्या पवित्र जलाचा उपयोग करून भूलोकाचा स्वर्ग करूं पहाणाऱ्या या आधुनिक भगीरथाचें नांव आहे कर्नल कॉटले!

एका ब्रिटिश इंजिनियरला भारतातल्या मोठमोठ्या इंजिनियरांनीं आधुनिक भगीरथ म्हणावें आणि त्याचें नांव घेतांना एखाद्या महर्षीचें नाव घेतांना दाखवावा तसा आदर दाखवावा याचें पुष्कळांना आश्चर्य वाटेल. पण शंभर वर्षांपूर्वी—१८५४ सालीं गंगेचा प्रचंड कालवा काढण्याची कल्पना कॉटलेला सुचावी, आणि उत्तर भारतांतल्या लक्षावधि गोरगरिबांच्या कोटकल्याणासाठीं अचाट धाडस करून त्यानें ती मूर्तस्वरूपांत आणावी, हें पाहिलें म्हणजे हा आदर योग्यच आहे असें वाटतें. उत्तर प्रदेशांतलीं विकासकार्यं दाखविण्याकरितां भारतसरकारनें नेलेल्या पत्रकारांबरोबर हा कालवा, या कालव्याच्या निमित्तानें निघालेलें रूर्कीचें विद्यापीठ, जलसशोधन केंद्र वगैरे पहावयास मिळालीं.

हरिद्वार येथें आम्ही उतरलो तेव्हां आम्हांला उतरवून घेण्याकरतां आलेल्या सरकारी इंजिनियरांनीं कॉटलेची सर्व कथा आम्हांला सांगितली. उत्तर प्रदेशांत अधिकारावर असलेल्या कॉटलेचें अंतःकरण दरवर्षी गंगेच्या पुराचें अमाप पाणी

फुकट जात असलेलें पाहून हळहळत असे. हरिद्वार येथें गंगेला एक प्रचंड कालवा काढून हें पाणी दोनशें मैलांवर असलेल्या कानपूरपर्यंत नेतां येईल, आणि हजारो एकर जमीन सुपीक करून लाखो गोरगरिबाना सुखी करतां येईल अशी एक अचाट कल्पना कॉटलेला सुचली. शंभर वर्षांपूर्वी इंजिनियरिंगचें शास्त्र आजच्या इतकें प्रगत नव्हतें. ही एक अडचण कॉटलेपुढें होतीच; पण त्याहिपेक्षां मोठी अडचण म्हणजे पवित्र गंगामाईला अशा तऱ्हेनें स्पर्श करायला म्लेंच्छ सरकारच्या म्लेच्छ इंजिनियराला धर्ममार्तण्ड शास्त्रीपंडित किंवा त्या काळची हिंदू जनता परवानगी देणें शक्य नव्हते. कॉटलेनें अनेकांच्या गाठीभेटी घेतल्या, गयावया केलें तेव्हां शेवटीं त्याला कुणी तरी सांगितलें कीं हरिद्वारच्या महापंडितानीं परवानगी दिली तर जनता आक्षेप घेणार नाही; आणि तुझे काम होऊ शकेल.

कॉटले महापंडितांकडे गेला आणि त्याचे पाय त्यानें धरले. महापंडित म्हणाले, 'तुला भगीरथासारखी तपश्चर्या करावी लागेल!' 'काय करू बोला,' तो म्हणाला. हरिद्वारपासून अठरा मैलांवर रूर्की नावाचें गाव होते. तिथेंच गंगेच्या कालव्यासाठीं हवे असलेले इंजिनिअर तयार करण्याकरता पुढें १८४७ साली सरकारनें थॉमसन कॉलेज ऑफ् इंजिनियरिंग काढले; आणि १९४७ साली भारत स्वतंत्र झाल्यावर पंडित जवाहरलालानीं पुढाकार घेऊन या कॉलेजचें इंजिनियरिंग शास्त्राचें कसून संशोधन व्हावें म्हणून रूर्की विद्यापीठांत रूपान्तर केलें. असो. 'या रूर्कीपासून हरिद्वारपर्यंत अठरा मैलाचें अंतर तू सोवळें नेसून आणि पायांत फक्त खडावा घालून चालत आले पाहिजे, आणि आम्ही सांगू तशी गंगामाईची पूजा केली पाहिजे,' महापंडित कॉटलेला म्हणाले, 'एवढें केलेंस तर गंगेला कालवा काढण्याची परवानगी मिळेल!'

कॉटलेनें हें दिव्य केलें. ही गोष्ट सांगणारे इंजिनियर आम्हांला म्हणाले, 'अठरा मैल खडावांनीं चालत आल्यामुळें कॉटलेच्या पायांचीं सालडीं निघून रक्त ठिबकत होतें, पण त्यानें तपश्चर्या पुरी केली, आणि गंगेची यथासांग पूजा करून कालव्याचें काम सुरू केलें! १८५४ साली हा कालवा पुरा झाला. १९५४ सालीं उत्तर प्रदेश सरकारनें या कालव्याची शताब्दी मोठ्या थाटामाटानें साजरी केली, आणि या समारंभाचें स्मारक म्हणून 'गंगानहर शताब्दी पूल' नांवाचा एक सुंदर नवा पूल हरिद्वार येथें 'हरिकी पायरी' जवळच खुला केला.

### रूर्कीच्या वाटेवर

हरिद्वार येथे गंगेला मायापूर धरण नांवाचें धरण बांधून हा प्रचंड कालवा काढला आहे. या धरणावर 'मायापूर डॅम् बंगलो' नांवाचें सुंदर अद्यावत् अतिथिगृह आहे. या बंगल्याभोवतालच्या रंगीबेरंगी फुलांनीं डंवरलेल्या मखमलीसारख्या हिरवळीवर उभे राहून समोरून खळाळत येणारें शुभ्र गंगाजल कितीतरी वेळ पाहिलें तरी समाधान होत नाही. दुपारीं 'गंगानहर शताब्दी पूल' दाखवायला आम्हांला इंजिनियरांनीं नेलें. 'हरिकी पायरी' कडून येणारा गंगेचा प्रवाह या पुलाखालून अतिशय वेगानें पुढें वाहातो. पाण्याच्या पातळीकडे सोंड उभारलेल्या हत्तींचीं तोंडें कोरलेल्या या पुलाच्या स्तंभाकडे, पुलावरून आपण एकाग्र दृष्टीनें खाली पाहूं लागलो कीं, पाणी स्थिर आहे आणि आपण हत्तीचीं तोंडें लावलेल्या एखाद्या प्रचंड नौकेतून झपाट्यानें पुढें जातों आहोंत असा एकसारखा भास होतो.

संध्याकाळी पाच वाजतां हरिद्वारहून रूर्कीला जाण्यासाठीं मोटारीनें निघालो. हरिद्वार ते रूर्की रस्ता या कालव्याच्याच कांठानें आहे. काठाशी ठिकठिकाणीं मोटार उभी करून, शंभर वर्षांपूर्वी बांधलेला असूनहि आजच्या इंजिनियरांनाहि आदरानें मस्तक नम्र करायला लावतील अशा कित्येक युक्त्या निरनिराळ्या अड-चणी दूर करण्याकरतां कॉटले आणि त्याच्या सहकाऱ्यांनी कशा योजल्या आहेत ते आमच्या बरोबरचे इंजिनियर आम्हाला सांगत होते. एके ठिकाणीं धानोरी नांवाची नदी कालव्याला आडवी येते. तिचें पाणी अशा खुबीनें कालव्यांतून बाहेर काढलें आहे, कीं नदीचा प्रवाह पुढें जातो,—जादा पाणी कालव्याला मिळते. कांही मैलांवर सोलनी नांवाची लहानशी नदी भेटली. तिचा प्रवाह कालव्यावरून पुढें सोडला आहे. कालवा खालून पुढें सटकतो.

वाटेंत पथरी पॉवर हाऊस—पथरी बिजली घर आणि बहादराबाद हायड्रॉलिक रिसर्च स्टेशन किंवा जलविज्ञान केंद्र पाहून घेतलें. कालव्याच्या पाण्याचा एक धबधबा साधून पथरी येथील बिजली केंद्र उभारलें आहे. १९५६ च्या जानेवारी महिन्यांत या केंद्राचें काम सुरू झालें, आणि सोळा हजार किलोवॅट वीज तें निर्माण करूं शकतें. बहादराबाद येथें एक लहानसा धबधबा आहे आणि त्यावर साडेचार हजार किलोवॅट वीज निर्माण करणारें एक केंद्र पूर्वी होतें. पथरी बिजलीघर झाल्या-पासून हें वीजकेंद्र बंद करून तिथें आतां जलविज्ञान संस्थेची इमारत बांधण्यांत

आली आहे. इथें निरनिराळ्या प्रकारच्या धरणांचे नमुने करून आणि त्यांवरून पाणी सोडून कालवे, धरणं वगैरेंना उपयुक्त असें संशोधन चालतें. इथलीं चिमुकलीं धरणें, आणि खेळांतल्यासारखे कालवे–धबधबे पहातांना मजा वाटली.

संध्याकाळचे सात साडेसात झाले होते. दूर रूर्कीचे दिवे लुकलुकत होते. गांवांत शिरण्यापूर्वीं गंगा कालव्याच्या कांठीं शंभर वर्षांपूर्वीं बांधलेलें इंजिनिअरिंग कॉलेजचें काळवंडलेलें प्रचंड वर्कशॉप दिसलें. विद्यापीठाच्या रजिस्ट्रारनीं आमचें स्वागत केलें आणि सर्व सोयींनीं युक्त अशा विद्यापीठाच्या सुंदर अतिथिगृहांतल्या आमच्या खोल्यांत आम्हांला नेऊन सोडलें.

### *जलसिंचाई अनुसंधान*

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रूर्की विद्यापीठाचीं निरनिराळीं खातीं पहावयाला बाहेर पडलों. रजिस्ट्रार श्री. पाल आम्हांला सर्व कांही दाखवीत होते. १८४७ साली स्थापन झालेल्या इंजिनियरिंग कॉलेजचें स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर विद्यापीठ करण्यांत आलें. उत्तर प्रदेश सरकार या विद्यापीठासाठीं दरसाल वीस लक्ष रुपये खर्च करतें. फक्त शंभर विद्यार्थी पदवीच्या संशोधनकार्याकरतां निवडले जातात. त्यांपैकीं पाऊणशें उत्तर प्रदेशांतले घ्यायचे, अकरा आशिया-आफ्रिकें-तल्या देशांतले आणि चौदा भारतांतल्या इतर प्रांतांतले, असें प्रमाण आहे. प्रवेशपरीक्षा फार कठीण आहे. पदवीनंतरच्या संशोधनाकरितां पंचवीस विद्यार्थी घेतात. डिप्लोमाचे शंभर आणि दोनशें तांत्रिक साहाय्यक तयार करतात. कालवे आणि कृषिसिंचन शास्त्रांचे जागतिक कीर्तीचे भारतीय इंजिनियर श्री. खोसला हे विद्यापीठाचे व्हाइसचॅन्सेलर आहेत. विद्यापीठाच्या ग्रंथालयात कांहीं दुर्मिळ ग्रंथ पाहिले. त्यांत शेक्सपिअरच्या नाटकांची इ. स. १६२३ ची एक आवृत्ति होती.

एका खात्यांत कोणतें सिमेंट कॉंक्रीट किती दाब आणि किती ताण सहन करूं शकतें याचे प्रयोग चालले होते. इलेक्ट्रिकल इंजिनीयरिंग लॅबोरेटरीची इमारत नवी कोरी आणि अद्यावत् आहे. तिच्या प्रवेशद्वारावर ‘ वैजवार्तक प्रयोगशाला ’ अशीं हिंदी अक्षरें कोरलेली होतीं! विद्यार्थ्यांचें विश्रांतिगृह एखाद्या राजवाड्यां-तल्या दिवाणखान्यासारखें आरामशीर खुर्च्याकोचांनीं सजवलेलें दिसलें. विद्यार्थ्यांचें भोजनगृहहि तसेंच भव्य होतें. तिथेंच आमचें दुपारचें भोजन झालें. प्रो. माल्टी नांवाचे जगविख्यात इंजिनियर पाहुणे, प्राध्यापक म्हणून सध्यां या विद्यापीठांत

आहेत. ते, विद्यापीठाचे इतर प्राध्यापक आणि एक इंडो—चिनी तज्ज्ञ आमच्याबरोबर जेवायला होते. जेवणापूर्वी रूर्कीत गंगा—कालव्याच्या काठीं उत्तर प्रदेश सरकारनें बाधलेलें 'जलसिंचाई अनुसधान केंद्र' (इरिगेशन रीसर्च सेंटर) पहावयाला गेलो होतो. 'वैजवार्तक प्रयोगशाले'सारखीच या केंद्राचीहि भव्य दुमजली इमारत नवी कोरी आहे. या केंद्रात कालवे, पाटबंधारे, शेतीच्या जमिनींचे निरनिराळे प्रकार, वगैरे विषयाचें तज्ज्ञांकडून सशोधन चालतें. एका भव्य दालनात उत्तर प्रदेशांतल्या ठिकठिकाणच्या पाटबंधाऱ्यांचा, कालव्यांचा आणि वीजकेंद्रांचा एक अवाढव्य ठशांचा नकाशा काचेच्या घरांत ठेवला आहे. त्यांत लाल, हिरवे, निळे चिमुकले विजेचे दिवे बसविले आहेत. निरनिराळ्या योजनाच्या आकृत्या निरनिराळीं बटनें दाबून प्रकाशित करतां येतात. आणि पहाणाराला त्या त्या योजनेची कल्पना येते. गंगा यमुनेसारख्या महान् नद्या उत्तर प्रदेशांतून किंवा इथल्या लोकांच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे या रामकृष्णांच्या देशातून वहात असल्यामुळें कालवे, पाटबंधाऱ्याच्या अनेक योजना इथले सरकार एकामागून एक आंखीत आहे; आणि त्याबरोबरच सशोधन केंद्राचीहि वाढ होत आहे.

## सोमनाथच्या विटा

मुंबईत आणि इतरहि मोठमोठ्या शहरात अलीकडे जागेच्या टंचाईचा प्रश्न अतिशय बिकट झाला आहे. तेव्हां दुपारीं रूर्की विद्यापीठाच्या आवारांतली 'सेंट्रल बिल्डिंग रिसर्च इन्स्टिटयूट' पहावयाला जातांना आम्हाला विशेष उत्सुकता वाटत होती. १९१८ सालापासून भारतीय लष्कराच्या इंजिनियरिंग शाखेत काम करीत असलेले लेफ्टनन्टजनरल सर हॅरॉल्ड विल्यम्स हे ब्रिटिश अधिकारी या संस्थेचे प्रमुख आहेत. त्यांचें बहुतेक आयुष्य भारतांत गेलें आहे आणि इथल्या परिस्थितीची त्यांना चांगलीच कल्पना आहे. भारत सरकारचाहि त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे. ब्रिटिश सैन्यांत ते मेजर—जनरल होते; आपल्या सरकारनें त्याना लेफ्टनंट जनरल केलें आहे. हा उंच, धिप्पाड, सुस्वभावी, हुषार म्हातारा आम्हांला सर्व माहिती मोठ्या आस्थेनें देत होता. संस्थेची इमारत अत्यंत आधुनिक पद्धतीची आहे. इथली निरनिराळीं खातीं, तिथली यंत्रसामुग्री आणि तिथें चालणारी कामें फार मनोरंजक वाटली. कृत्रिम उष्णता आणि कृत्रिम

पाऊस निर्माण करून एका खात्यात भिंतीला लावावयाच्या निरनिराळ्या रंगांवर प्रयोग चालले होते. कोणता रंग पावसाच्या किंवा उन्हाच्या माऱ्यांत किती काल टिकतो याचें संशोधन इथें चाललें होतें. आग्र्याचे श्री. कापसे नावाचे महाराष्ट्रीय शास्त्रज्ञ या खात्यांत काम करीत होते. इंदूरचे श्री. पटवर्धन यांनीं 'वेदरोमीटर' नांवाचें यंत्र आम्हांला दाखविलें. 'टिंटोमीटर' नांवाचें यंत्र रंगाच्या कोणत्या छटा दुसऱ्या कोणत्या छटांशीं संगति साधूं शकतात हें दाखवितें. हिरवा आणि चॉकोलेटी रंगांत अधिक टिकाऊ कोणता हें एक संशोधक अजमावीत होता.

गंगेचें खोरें, यमुनेचें खोरें वगैरे ठिकठिकाणच्या मातीवर, टिकाऊ विटेसाठी कोणती माती अधिक उपयुक्त होईल याचे प्रयोग एका दालनात चालू होते. गझनीच्या महमुदानें फोडलेल्या सोरटी सोमनाथाच्या मूळ देवालयाच्या कांहीं विटा तिथें होत्या. त्याबरोबरच सातआठ वर्षांपूर्वीच तिथें बसवलेल्या कांहीं नव्या विटाहि होत्या. शेंकडों वर्षांपूर्वीच्या त्या जुन्या विटा हल्लींच्या विटांच्या मानानें फारच कमी खराब झाल्याचें तिथल्या संशोधकानें आम्हांला सांगितलें! एक विजेचें यंत्र इमारतीचा कोणता भाग किती मजबूत किंवा किती ढिला आहे हें आपल्या बदलणाऱ्या विद्युल्लहरींनें दाखवूं शकते. तें पहात असतां एक विचार सारखा माझ्या डोक्यांत घोळत होता. मुंबईत व इतरत्र दर पावसाळ्यांत कांहीं जुन्या इमारती कोसळतात आणि केव्हा केव्हां प्राणहानीहि होते. या प्रकारचें विजेचें यंत्र प्रत्येक नगरपालिकेनें घेतलेंच पाहिजे आणि वेळोवेळीं जुन्या इमारतींची या यंत्रांच्या सहाय्यानें तपासणी झालीच पाहिजे असा कायदा सरकार कां करीत नाही? हीं यंत्रें काय खेळणीं म्हणून तयार केलीत?

एका दालनांत 'आर्किटेक्चरल फिजिक्स' चे तज्ज्ञ श्री. घोष यांनीं अगदीं थोड्या खर्चांत बांधलेलें पण सर्व ऋतूंत जास्तींत जास्त आराम देणारें घर कसें असावें, त्याचा एक नमुना दाखवला. खेळातल्या घरासारखें घर होतें; आणि निरनिराळीं बटनें दाबून कोणत्या ऋतूंत सूर्यप्रकाश कोणत्या खोलीत कसा येईल तें दाखवितां येत होतें. दुसऱ्या एका दालनांत, पोलाद आणि सिमेंट अलीकडे मिळत नाहीं तेव्हां तें न वापरतां बांबूचे सलपे आणि सिंद्री खतकारखान्यांत दर दिवशीं फुकट जाणाऱ्या शेंकडों टन राखेपासून सवंग सिमेंट करून त्यांच्या मिश्रणानें तितक्याच मजबूत भिंती किंवा छपरें कशीं तयार करतां येतील यासंबंधींचे प्रयोग चालले होते. 'फोम् कॉंक्रीट' तयार करण्याकरतां परदेशांहून कांहीं वस्त

आयात कराव्या लागतात. सिंद्री कारखान्यांतला टाकाऊ गाळ वापरल्यास या आयातींची आवश्यकता नाही, असें इथें काम करणारे संशोधक म्हणाले. श्री. खाडीलकर नांवाचे आणखी एक महाराष्ट्रीय शास्त्रज्ञ इथें भेटले. मातीच्या कुंड्या एकांत एक घालून त्या घराच्या छपरासाठीं सिमेंट लावून वापरल्यास उष्ण हवेंतली घरें अधिक आरामदायक कितपत होतील, या संबंधींचे प्रयोग त्यांनीं आम्हांला दाखवले. लेफ्ट. जनरल विल्यम्स आणि त्यांचे सहकारी यांच्या बरोबर चहा घेऊन आम्ही आमच्या निवासस्थानीं परत आलो.

•

## डेहराडूनचें महत्त्व

उत्तर प्रदेशांतलें डेहराडून हें शहर हिमालयाच्या सान्निध्यामुळेंच नव्हे तर भारताच्या विकासाच्या दृष्टीनें काम करणाऱ्या अनेक मोठ्या संस्थांचें माहेरघर म्हणून प्रसिद्ध आहे. डूनमध्यें आल्यानंतर पहिल्यांदां कसली आठवण होत असेल तर ती 'मिलिटरी ॲकॅडेमी'ची. ब्रिटिशाचें राज्य असतांना हिंदी माणसालाहि लष्करी अधिकारी होण्याकरितां इंग्लंडांत सॅण्ढर्स्ट येथील लष्करी विद्यालयात शिक्षण घ्यावें लागे. नंतर १९३२ साली त्या काळचे हिंदुस्थानचे सर सेनापति सर फिलिप चेटवुड यांनीं डेहराडून येथें 'इंडियन मिलिटरी ॲकॅडेमी' सुरू केली, आणि हिंदी तरुणांना तिथें लष्करी शिक्षण मिळूं लागलें. आतां १९५४ सालापासून पुण्याजवळ खडकवासला येथें 'नॅशनल डिफेन्स ॲकॅडेमी'ची भव्य इमारत झाली आहे आणि लष्करी शिक्षण घेऊं इच्छिणाऱ्या तरुणांना पहिलीं तीन वर्षे तिथें शिक्षण घ्यावें लागतें. शेवटच्या वर्षाच्या शिक्षणाकरतां अजूनहि डेहराडूनमधल्या 'मिलटरी ॲकॅडेमी'तच जावें लागतें.

शिक्षण पुरें झाल्यानंतर जिथें दीक्षांत समारंभ होतो तो 'चेट्वुड हॉल' आणि त्यासमोरील 'परेड ग्राऊंड' पहाण्यासारखें आहे. खूप उंच छत असलेला, सुंदर लांकडी तक्त्यांनीं मढवलेल्या भिंतींचा चेट्वुड हॉल अतिशय भव्य आहे. या हॉलच्या उंचच उंच भिंतींवर चारहि बाजूंना 'व्हिक्टोरिया क्रॉस' मिळालेल्या वीरांचीं चित्रें आहेत; आणि मधूनमधून ज्या पलटणी आतां अस्तित्वांत नाहींत त्यांचीं भव्य निशाणें टांगली आहेत. वरच्या मजल्यावरल्या वस्तुसंग्रहालयांत मशीनगन्, ब्रेनगन् वगैरे अद्यावत् शस्त्रास्त्रें आणि इटालियन, जर्मन, जपानी फौजांचीं युद्धांत हरण केलेलीं शस्त्रें मांडून ठेवलीं आहेत. प्रवेशद्वारावर धनुष्याची

दोरी ओढीत असलेल्या द्रोणाचार्यांचें एक सुंदर ठशांचें चित्र दिसलें. शिवाजी महाराज आणि राणा प्रताप यांच्या रंगीत तसबिरीहि एका दालनांत होत्या. दीक्षान्त समारंभानंतर नवीन लष्करी अधिकाऱ्यांची जिथे परेड होते त्या सुव्यवस्थित मैदानावरून इतर वेळीं कुणीहि आडवें चालत जायचें नाहीं, असा नियम आहे. आजूबाजूच्या रस्त्यानें जायचें. त्या जागेचा एक विशिष्ट मान असा राखला जातो.

या संस्थेचें सर्वच कांहीं बादशाही थाटाचें आहे;—विद्यार्थ्यांच्या खोल्या, वाचनालय, कॅन्टीन, सिनेमागृह, पोहण्याचा तलाव, आजूबाजूला दूरच्च दूर पसरलेली सपाट हिरवळ, फुलझाडांचे कुंज सर्व कांही भव्य आणि टापटिपीचें आहे. हें सर्व पाहून झाल्यावर कमांडण्ट रणधीरसिह यांच्याबरोबर आमचा चहा झाला. बोलतां बोलता ते म्हणाले, 'लष्करी अधिकारी व्हायचें असेल तर आमच्याकडे यायचे तीन रस्ते आहेत. मॅट्रिक झाल्यावर आमच्या प्रवेशपरीक्षेत पास होऊन खडकवासल्याला जायचें, बी. ए. किंवा बी. एस्सी. असल्यास सरळ इथे ॲकॅडेमींत प्रवेश घ्यायचा किंवा लष्करात साधा शिपाई म्हणून भरती व्हायचें आणि योग्य हुषारी दाखवून ॲकॅडमींत यायचें.—'

ॲकॅडेमी पाहून परत येतांना प्रख्यात डून् स्कूल पहावयाला गेलो. इंग्लंडमधल्या ईटन्, हॅरोसारखी या शाळेची भारतात ख्याति आहे. सध्यां ली मार्टिन् नांवाचे गृहस्थ शाळेचे प्रिन्सिपल आहेत. चित्रकला, संगीत वगैरे शिकवण्याचे वर्ग, वाचनालय, वसतिगृह व खेळण्याच्या जागा, सर्व कांहीं खानदानीचें आहे. संगीतशिक्षक श्री. देशपांडे यानीं आम्हाला बरीच माहिती दिली. देशपांडे यानीं नागपूर, इंदूर आणि लखनौ येथे शिक्षण घेतलें आहे. प्रत्येक विद्यार्थ्याची वार्षिक फी रु. २२०० आहे; आणि तरीहि १९६७ पर्यंतच्या जागा भरून गेल्या आहेत! या शाळेंत मुलाला घालायचें असेल तर तो जन्माला आल्याबरोबरच, किंवा शक्य तर त्याआधींच जागा रिझर्व्ह करावयाला पाहिजे! या शाळेचे संस्थापक श्री. एस. आर. दास होते. सध्यां चेअरमन् सी. डी. देशमुख असून प्रेसिडेंट् राष्ट्रपति राजेन्द्रबाबू आहेत.

## *आंधळ्यांचें ग्रंथालय!*

दुपारीं आंधळ्यांसाठीं ब्रेल लिपींत पुस्तकें छापण्याचा खास छापखाना सरकारनें डेहराडूनमध्यें काढला आहे तो पहावयाला गेलों. हा 'ब्रेल प्रेस' म्हणजे खरोखरच

एक अद्‌भुत गोष्ट आहे. आंधळयांना हात फिरवून वाचतां यावीं अशी ठशानें उठवलेल्या सहासहा टिंबांच्या अक्षराची एक लिपी ब्रेलनें तयार केली, हें विख्यात आहे. या इंग्रजी लिपीच्या आधारें आतां मराठी, गुजराती ब्रेलहि तयार झाली आहे. तांबड्या विटांच्या टुमदार इमारतींत हा छापखाना आहे. इतका स्वच्छ छापखाना जगांत कुठं नसेल; कारण शाईनें कागदावर काहीं छापण्याचा इथें प्रश्नच उद्‌भवत नाही ! अत्रे—घाटे याची नवयुग वाचनमाला मराठी आंधळ्यां-साठीं, आणि एक गुजराती वाचनमाला गुजराती आंधळ्यासाठीं इथें छापली जात होती. डोळस वाचकांसाठी तयार केलेले लहानसं पहिलं पुस्तक आंधळयांसाठीं ब्रेल्‌मध्यें करावयाचें म्हणजे त्याचा चांगला लांबरुंद, जाडजूड फायलीसारखा ग्रंथ-राज होतो ! साहजिकच आहे. जाड कागदावर सहासहा टिंबांचें एक एक अक्षर ठशासारखें उठवीत एक एक पान तयार करावें लागतें, आणि मग हीं पानें एकत्र बांधून भलं लठ्ठ पुस्तक होतें.

या छापखान्याचे मुख्य अधिकारी अमेरिकेंत दोन वर्षे खास शिक्षण घेतलेले श्री. भट्टाचार्य हे आहेत. ते म्हणाले, ही यंत्रसामुग्री आणि हा छापखाना इतक्या किमतीच्या आहेत कीं सरकारच त्या विकत घेऊं शकतें, आणि चालवूं शकतें. नेहमींच्या छापखान्यांत ज्याप्रमाणें टाईप रचले जाऊन मजकुराचा 'फर्मा' तयार होतो त्याप्रमाणें इथें ॲल्युमिनियमच्या पत्र्यावर यंत्रानें उठवलेल्या टिंबांचें पान तयार होतें. प्रुफ तपासायची म्हणजे उगाच उठलेलं टिंब चिमट्यानें दाबून बसवायचं किंवा न उठलेलं उठवायचं.

मोटवानी नांवाचा एक चाळिशी उलटलेला आंधळा गृहस्थ गुजराती वाचन-मालेचीं 'प्रुफ तपाशीत' हातांत चिमटा घेऊन बसला होता. आम्ही त्याच्याभोंवतीं जमून त्याला अनेक प्रश्न विचारूं लागलो. तो हंसत खेळत चांगल्या इंग्रजींत उत्तरें देत होता. वयाच्या सहाव्या वर्षी तो साफ आंधळा झाला होता. 'कराची ब्लाईंड स्कूल' मध्यें त्याचें शिक्षण झालें. ब्रेल लिपींत सर्व विषयांचीं पुस्तकें मिळतात. तो म्हणाला, या लिपींतली पुस्तकें '**वाचून**' आणि या लिपींत '**छापलेले**' पेपर सोडवून तो आग्रा युनिव्हर्सिटीचा नुक्ताच इंटर झाला. गणित, भूमिति वगैरेंचे या लिपींतले पेपर हातानें चाचपून समजून घ्यायला वेळ लागतो; तरीहि युनिव्हर्सिटीनें इतर डोळस विद्यार्थ्यांपेक्षां थोडासुद्धां अधिक वेळ पेपर सोडवायला आपणाला न दिल्याचें तो सांगत होता.

सध्या राजकारण, अर्थशास्त्र आणि समाजशास्त्र हे विषय घेऊन आग्रा विद्यापीठाच्या बी. ए. साठीं तो अभ्यास करतो आहे. आम्हा सर्वांना तो अतिशय आवडला. मोठा हुषार, गमत्या आणि बोलका माणूस होता. 'स्टायलो' नांवाचें टिंबे उठवणारें पेन् घेऊन कागदावर ब्रेल्लिपींत पत्रहि लिहितां येते. ब्रेल टाईपरायटरहि आहे. भट्टाचार्यांच्याबरोबर आम्ही चहा घेत असतां मोटवानीलाहि तिथें बोलावलें होतें. त्यानें आम्हाला हां हां म्हणतां एक पत्र लिहून आणि टाईप करून दाखविलें. इथें छापलेली पुस्तकें आंधळ्यांना अगदीं माफक किमतींत सरकार देतें. साऱ्या भारतात एकंदर वीस लक्ष आंधळे आहेत. भट्टाचार्य म्हणाले, त्यांच्यासाठीं जितके करावे तितके प्रयत्न थोडेच होणार आहेत.

### *भारताची ठेव सर्पगंधा !*

डेहराडूनमधली साऱ्या भारतांत प्रख्यात असलेली संस्था म्हणजे जंगल संशोधन संस्था किंवा 'फॉरेस्ट रीचर्स इन्स्टिटयूट.' या संस्थेची मुख्य इमारत अतिशयच भव्य आहे. मुख्य इमारत आणि इतर इमारतींच्या भोवतालच्या बागा म्हणजे मोठमोठ्या वृक्षांचीं जंगलेंच आहेत. संस्थेचे संपर्काधिकारी एका भव्य दालनांतले निरनिराळे लाकडांचे नमुने आम्हांला दाखवीत होते. 'आस्ना' किंवा 'सेन' जातीचें लांकूड अतिशय स्वस्त आहे; पण त्याचीं खुर्च्याटेबलें 'वॉल्नट' सारख्या मौल्यवान् लाकडांच्यासारखीं सुंदर आणि चकचकीत दिसत होतीं. 'वॉल्नट'चें म्हणून हें फर्निचर तुम्हांला कुणी विकलें तर तुमच्या मुळींच ध्यानांत येणार नाही, ते अधिकारी म्हणाले. एका क्युबिक फूट लाकडांत पाणी किती असतें तें दाखविण्याकरतां त्याला निळसर रंग देऊन तें पाणी एका कांचेच्या भांड्यांत ठेवलेलें होतें. लांकडांत ऐशीं टक्के पाणी असतें, हें ऐकून आम्हाला आश्चर्य वाटलें. लाकूड 'सीझन' करावयाचें म्हणजे हे पाण्याचें प्रमाण वीस टक्क्यांवर आणायचें.

नंतर जंगलांतल्या लहानसहान वस्तूंच्या ('मायनर जंगल् प्रॉडक्ट्स्') दालनाकडे आम्ही गेलों. त्या विभागाचे अधिकारी श्री. भडवार आम्हांला माहिती देऊं लागले. भडवार हे भारतांतले एक नाणावलेले शास्त्रज्ञ आहेत. आयुर्वेदांतल्या औषधींचे गुणधर्म वर्णन करणारा ग्रंथराज (इंडियन् मटेरिया मेडिका) तयार करण्याकरतां श्री. चोप्रा यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या बारा जणांच्या

समितींत श्री. भडवार होते. या ग्रंथांत २३०० वनस्पतींचीं नांवें देऊन त्यांचें वर्गीकरण केलें आहे. एक हजार पानाचा 'इंडियन फार्माकोपिया' त्यांनीं प्रसिद्ध केला आहे. हा उंच, धिप्पाड पंजाबी माणूस जितका हुषार तितकाच विनोदी आहे. थोडक्याच वेळांत आम्हांला सर्व कांही सांगण्याकरतां अस्खलित इंग्रजींत अनेक कोट्या करीत ते आमच्यावर माहितीचा पाऊस पाडीत होते. पहिल्याच सलामीला त्यांनीं आम्हांला ठणकावून सांगितलें कीं या विभागाचें नांव 'मायनर फॉरेस्ट प्रॉडक्ट्स्' आहे तें सरकारकडून मी बदलून घेतलें आहे; यापुढें हा विभाग 'इकॉनॉमिक फॉरेस्ट प्रॉडक्ट्स्' या नांवानें ओळखला जाईल. अत्तरें, औषधें, तेल वगैरे आमच्या विभागांत ज्याचें संशोधन होतें त्या पदार्थांची ५० कोटी रुपयांची निर्यात आपला देश करतो, आणि लाकडाची निर्यात फक्त एका कोटीची आहे,—तरी लाकूड 'मेजर' प्रॉडक्ट आणि आमच्या विभागांतले 'मायनर प्रॉडक्ट्स्' काय ? ते उद्गारले.

'आम्हा जंगलखात्यांतल्या अधिकाऱ्यांची 'लाकूड विरुद्ध गवत' अशी धुमश्चक्रीची लढाई सध्यां चालू आहे,' ते हंसत म्हणाले. सुगंधी वनस्पतींचें संशोधन करून असल्या वनस्पतींच्या १३०० जाती आपल्या विभागानें शोधून काढल्याचें त्यांनीं सांगितलें. 'लेमन् ग्रास ऑइल,' 'रोझ् ऑइल,' वगैरे—साबू सुगंधित करण्याकरिता वापरावयाचीं अनेक तेलें त्यांनीं आम्हांला दाखविलीं. 'कातडीं कमावण्याकरतां लागणारे फक्त चार प्रकारचे पदार्थ आपले खेड्यापाड्यांतले चांभार वापरतात, —आम्ही आतां असले तीनशें पदार्थ शोधून काढलेत,' ते म्हणाले. 'कापूर मुख्यत्वेंकरून फॉर्मोसा बेटांतून आपल्या देशांत येतो. वीस लक्ष पौंडांची वार्षिक आयात आहे. कुठेंहि उगवणाऱ्या आणि हिंदूंच्या घरींदारीं असलेल्या सर्वपरिचित तुळशीपासून कापूर तयार करण्याचे प्रयोग भडवारांचें खातें करतें आहे. रक्तपितीवर गुणकारी ठरलेली 'छाल मोगरा' या वनस्पतीचें बरेंच संशोधन झालें आहे. रक्तदाबावर रामबाण म्हणून आतां विश्वविख्यात झालेली 'सर्पगंधा' वनस्पती फक्त भारतांत होते. समुद्रसपाटीपासून तीन हजार फूट उंचीवर असलेल्या कोणत्याहि प्रदेशांत ती रुजूं शकते. एका एकरांत जर सर्पगंधा लावली तर आजचा दर लक्षांत घेतां तुम्हाला वर्षाकाठीं दोन हजार रुपये फायदा करतां येईल, भडवार हंसत म्हणाले, 'पहा तुमच्यापैकीं कुणाला पत्रकाराचा धंदा सोडून हा धंदा करायचा आहे का ?'

नंतर गंभीर चेहेरा करून ते सांगूं लागले, 'या मौल्यवान् वनस्पतीचें बी बाहेर कुठं जाणार नाहीं याची आपण अतिशय काळजी घेतली पाहिजे. तुम्हाला माहीत आहे ना, ब्राझिलमध्यें रबराची झाडें होतीं. मलायाची हवा ब्राझीलसारखीच आहे. ब्रिटिशानीं हरप्रयत्न करून ब्राझीलमधून रबराच्या फक्त चार बिया चोरल्या आणि मलायात पेरल्या. आज मलायाच्या रबरानं साऱ्या जगाची बाजारपेठ काबीज केली आहे!'

### *अश्वमेध यज्ञांतले तांदूळ*

भडवाराचे आभार मानून डॉ. घोषांच्या 'वुड लायब्ररीत' आम्ही शिरलो. 'वुड लायब्ररी' हा शब्दप्रयोग चमत्कारिक वाटतो. लाकडाचें ग्रंथालय म्हणजे काय? पण इथले 'ग्रंथ' पाहिले कीं हा शब्द बरोबर वाटतो. हराप्पा मोहेंजो-दारोच्या म्हणजे पांच-सहा हजार वर्षापूर्वीच्या प्राचीन काळापासून तो आजतागायतचे सात हजार परदेशी आणि कित्येक हजार देशी 'ग्रंथ' किंवा लाकडांचे नमुने इथें नांवनिशीवर व्यवस्थित लावून ठेवले आहेत. हराप्पा येथे उत्खननांत सांपडलेले तांदूळ आणि तांदळाचें तूस इथें आहे. डेहराडूनपासून ५८ मैलांवर कलसी नांवाचें गाव आहे. तिथे चाललेल्या उत्खननांत इसवी सनापूर्वी एक हजार वर्ष म्हणजे जवळजवळ तीन हजार वर्षांपूर्वी झालेल्या अश्वमेध यज्ञांचे अवशेष सांपडले आहेत. अगदीं पुराणांत वर्णिल्याप्रमाणें उत्तराभिमुख गरुडाच्या आकाराची यज्ञवेदी आहे. खदिर लाकडाच्या अग्नीवर, बळी दिलेल्या घोड्याचें रक्त शास्त्रानुसार उकळवायचें असतं. या उत्खननात सांपडलेले जळक्या लाकडाचे तुकडे खदिर लाकडाचेच आहेत. ते या 'ग्रंथालयांत' दिसले.

तांदूळ व तांदळाचें तूस उत्खननात सापडलें याचा अर्थ तीन हजार वर्षांपूर्वीपासून भारतीयांना तांदूळ माहीत आहे. चीन आणि जपान या देशांनीं तांदूळ पहिल्यांदा पिकवला हा सिद्धान्त आता टिकूं शकत नाहीं, असें रशियन शास्त्रज्ञ व्हाव्हिलॉव्ह याचेंहि म्हणणें आहे. 'लिग्नम् विटी' नांवाच्या एका लांकडाचा नमुना डॉ. घोष यांनीं आम्हांला दाखवला. तो पोलादासारखा कठीण होता. आगबोटीच्या पंख्यासाठीं पोलादाऐवजीं हे लांकूड वापरतात, असें घोष म्हणाले. हें 'ग्रंथालय' पाहून निरनिराळ्या संग्रहालयांकडे वळलों. 'सिल्व्हिकल्चर म्युझियम्'मध्यें निरनिराळ्या प्रकारच्या वृक्षांचीं जंगलें कशीं वाढवतात, त्यांचे

सुंदर रंगीत नमुने कांचेच्या घरांत ठेवलेले होते. लांकूड पोखरून फस्त करून टाकणाऱ्या लहानमोठ्या कीटकांचें 'एंटॉमॉलोजिकल म्युझियम्' पहात असतां कांहीं किडे आकारानें आणि रंगानें इतके सुंदर दिसले कीं लांकूड फुकट गेलें तरी बेहेत्तर पण या किड्यांना मारूं नये असा विचार मनांत येऊन गेला! माणसांना हे कीटक त्रासदायक होत असले तरी त्यांना निर्माण करणारा जो परमेश्वर असेल त्याला तें तसें त्रास वाटत नसावें!

## आश्चर्य यंत्र

'व्हिदर टिंबर एंजिनियरिंग' या नांवाचें संग्रहालय असलेला एक अगदीं नवीन विभाग या संस्थेंत नुकताच सुरू करण्यांत आला आहे. बांबूचे तुकडे, तासलेल्या लांकडाचीं सालपटें वगैरे टाकाऊ म्हणून फुकट जात असलेल्या पदार्थांचे किती तरी उपयोग आहेत हे दाखविण्याकरतां हा विभाग श्री. मसानी नांवाच्या एका तज्ज्ञाच्या देखरेखीखालीं काम करतो. पोलादाच्या कमानीऐवजीं बांबूचे तुकडे आणि सालपटें यंत्रानें एकत्र दाबून तयार केलेलीं फळकुटें रंगमंदिरांच्या किंवा कारखान्यांच्या छपरांकरतां सर्रास वापरावयाला हरकत नाही, हें कांही मजबूत नमुने दाखवून मसानींनीं आम्हांला समजावून दिलें. 'जंगल खात्यातर्फे ठिकठिकाणीं बांधली जाणारीं विश्रांतिगृहें आतां याच पद्धतीनें आम्ही बांधतों,' ते म्हणाले.

इथून लांकडें 'सीझन' केली जातात आणि त्याचे पातळ पत्रे कापून ते एकमेकांना चिकटवून ट्रिप्लिकेट किंवा प्लायवुड केलें जातें त्या विभागांत गेलो. पांचपांचशें टन वजनाचा दाब देऊन लाकडांचे पत्रे एकत्र दाबणारीं, अजस्र सुंऱ्यांच्या हां हां म्हणतां हव्या त्या जाडीच्या फळ्या कापणारीं, अरुंद फळ्या गोंदानें एकमेकांना घट्ट चिकटवून रुंद फळ्या बाहेर टाकणारीं,—असलीं राक्षसी यंत्रें पाहून छाती धडधडूं लागते.

भारताच्या सर्व्हेअर-जनरलची डेहराडूनमधील कचेरीहि प्रेक्षणीय आहे. अनेक सफेत रंग दिलेल्या छोट्या छोट्या इमारतींत या कचेरीच्या शाखा आहेत. भारताचे राजकीय विभाग दाखविणारे, पीक—पाण्याचें दर्शन देणारे, डोंगर-दऱ्या दाखवणारे असे नाना प्रकारचे अजब नकाशे इथें सूक्ष्मांत सूक्ष्म मोजमाप करून तज्ज्ञ चित्रकार तयार करीत असतात. नंतर मोठमोठे राक्षसी कॅमेरे वापरून

त्यांच्या प्रतिकृति केल्या जातात, आणि खास यंत्रसामुग्रीनें सज्ज असलेल्या छापखान्यांत हे नकाशे अनेक रंगांत छापले जातात. इथल्या कॅमेरायंत्रांना मी राक्षसी म्हटले त्याचा पुरावा म्हणजे एका कॅमेऱ्याच्या मागले दार उघडून आम्ही दोघेतिघे कॅमेऱ्याच्या पोटांत जाऊं शकलों! कॅमेरा म्हणजे खोलीच होती आणि त्या मानानें त्याची कांच किंवा लेन्स होती!

डेहराडूनच्या करणपूर भागांत या कचेरीची आणखी एक शाखा आहे. तिथें एव्हरेस्ट शिखराची बरोबर उंची ज्या 'थिओडोलाईट्' यंत्रानें मोजण्यांत आली तें यंत्र आणि एव्हरेस्टसाहेब आणि मोजमाप करणारे त्यांचे बंगाली सहकारी राधानाथ सिकदर यांचे फोटो आहेत. धरणीकंपाची सूचना देणारें यंत्र, अक्षांश रेखांश ठरविण्याकरितां वापरावयाच्या अजस्र दुर्बिणी इत्यादि यंत्रेंहि ठिकठिकाणीं ठेवली आहेत. पण इथें मुद्दाम पहाण्यासारखे—ज्याला 'वंडर मशीन्' किंवा 'आश्चर्य यंत्र' म्हणतात तें यंत्र म्हणजे सुवेझ ते सिंगापूरपर्यंत पसरलेल्या समुद्राच्या भरती-ओहोटीच्या वेळा बिनचूक सांगणारें यंत्र. एखाद्या भल्या मोठ्या कांचेच्या कपाटांत शेंकडों लहानमोठीं घड्याळाचीं यंत्रें तारांनीं एकमेकात गुंतवून ठेवावीं तसें हें यंत्र दिसतें. सुवेझ तें सिंगापूरपर्यंतच्या बंदरांना इथून वेळोवेळीं तारा जातात आणि जहाजें बाहेर केव्हां काढावीं किंवा बंदरात घ्यावीं या संबंधींच्या सूचना दिल्या जातात. तिथले अधिकारी म्हणाले, गणित जाणणारे चार कारकून जे हिशेब अडीच वर्षे काम करून पुरे करू शकतील, ते या यंत्रावर काम करणारा एक माणूस अडीच दिवसात करतो!

## पांडव-विवाह करणारी जमात

संध्याकाळीं डेहराडूनमधलें एक जुनें गुरुद्वार पहायला गेलों. मशिदीसारख्या कमानी कोरलेल्या भिंतींच्या या जुनाट गुरुद्वाराचा इतिहास मजेदार आहे. गुरुद्वार म्हणजे शिखांचें पवित्र मंदिर; पण इथें शीख मुळींच येत नाहींत—हिंदू स्त्री-पुरुषांचीच गर्दी असते. शिखांचे सातवे गुरु हरराय यांचा मुलगा गुरु रामराय यानें हें गुरुद्वार बांधलें. डेहराडून गांवाचा संस्थापक हाच गुरु म्हणतात. या रामरायानें आपल्या पित्यासमोर म्हणजे गुरु हररायांसमोर शिखांचा अमानुष छळ करणाऱ्या औरंगजेबाची स्तुति केली, त्यामुळें संतापानें पित्यानें मुलाला घराबाहेर घालवून दिला. तेरीगढवालच्या राजासाठीं औरंगजेबानें एक पत्र या रामरायाच्या

हातीं दिलें. त्या राजानें, बहुधा आतां ज्याला डेहराडून म्हणतात ती जमीन जहागीर म्हणून रामरायाला दिली असावी. या रामरायाची समाधि या गुरु-द्वारांत आहे. त्याचा पलंग व वस्त्रे बाजूच्या खोलीत आहेत. या समाधीची रोज पूजा होते आणि प्रसाद वाटला जातो. भक्तगण हिंदूच दिसला.

या रामरायाचे वंशज शेजारच्याच घरांत रहातात. त्याना भेटायला डेहराडूनचे संपर्काधिकारी आम्हांला घेऊन गेले. कसलेल्या देहयष्टीचे, दाढीदार गोरापान चेहेरा असलेले हे महंत वयानें तरुण आहेत. आपण अविवाहित असून उदासी पंथाचे आहोंत असें ते म्हणाले. त्यांचें बोलणें चालणें अत्यंत सुसंस्कृत होतें. त्यांच्या दिवाणखान्याच्या भिंती जुन्या गुरूंच्या रंगीत तसबिरी आणि इतर चित्रांनीं भरून गेलेल्या दिसल्या. रामायण, महाभारत, गीता, ग्रंथसाहेब वगैरे धर्मग्रंथ त्यांच्या टेबलावर दिसले. जुन्या पद्धतीचें नक्षीदार खुर्च्या, टेबलें, कोच वगैरे फर्निचर दिवाणखान्यांत खच्चून भरलेलें दिसलें. डेहराडूनमध्यें हे महंत फार लोकप्रिय आहेत. डेहराडून सिटी बोर्डाचे ते लोकनियुक्त अध्यक्ष निवडले गेले. हे महंत नववे गुरु. त्यांच्या अनुयायांत हिंदू आणि शीख दोन्ही पंथांचे लोक असल्याचें कळलें. आमच्या बरोबर असलेले संपर्काधिकारी म्हणाले, 'हा गृहस्थ लोकप्रिय व्हायचें कारण उघड आहे. ते बुवाबाजी करीत बसले नाहींत. जहागिरीच्या पैशांचा सढळ हातानें ते लोकोपयोगी कार्या-साठीं उपयोग करतात. त्यांनीं अनेक शाळा आणि कॉलेजें स्वतःच्या पैशांनीं चालविलीं आहेत. एम्. ए. पर्यंत त्यांचें शिक्षण झालें असून आपल्या कांहीं शाळांतून आणि कॉलेजांतून ते वर्गहि घेतात.'

डेहराडूनमध्यें भेटलेले आणखी एक उल्लेखनीय गृहस्थ म्हणजे तिथल्या दयानंद ॲंग्लो-वेदिक कॉलेजच्या समाजशास्त्र विभागाचे प्रमुख डॉ. सक्सेना. डेहराडूनपासून पाऊणशें मैलांवर असलेल्या चक्राता या ठिकाणच्या आसपास जंवसरी बावर या डोंगराळ प्रदेशांत खस आणि डोम या आदिवासी जमाती आहेत. त्या जमातींच्या जीवनाचा खास अभ्यास डॉ. सक्सेनांनीं केला आहे. त्यांच्या नाचगाण्यांचे कांहीं रंगीत चित्रपटहि त्यांनीं घेतले आहेत. आपल्या घरीं त्यांनीं हे चित्रपट आम्हांला दाखविले. या जमातींचा विशेष म्हणजे चारपांच भावांची एकच बायको असते. या 'पांडवविवाह' पद्धतीचे परिणाम काय होत असावेत याचा सक्सेनांनीं अभ्यास चालविला आहे. १८५६ ते १९५६ पर्यंतचे

लोकसंख्येचे आंकडे पहाता या लोकांची संख्या ५६००० तशीच राहिली आहे; इतर जमातींप्रमाणें लोकसंख्येची झपाट्यानें वाढ होणें दूरच, पण थोडीशीहि वाढ झालेली नाहीं. यांचे नाकडोळे आर्य वंशीयांसारखे सरळ, सुंदर आणि वर्ण गोरा आहे. स्त्रियांचा वेष कशिदा काढलेल्या सुंदर रंगीबेरंगी कापडाचा असतो. पुरुषांना स्त्री-विषयक असूया माहीत नाहीं. लोक एकंदरीत पापभीरु आहेत. त्यामुळें गुन्हेगारी नाहींच म्हटलें तरी चालेल. हिंदुकुश पर्वत ओलांडून ते इराणमधून भारतात आले असावेत असा तर्क आहे. डॉक्टर साहेबांच्या सुंदर चित्रपटांनीं डेहराडूनची एक नवीनच बाजू दाखविली.

—वाङ्मयशोभा, १९५७

# जागा होत असलेला सिंह

*भारताच्या पंचवार्षिक योजना आणि भारताचें एकंदर आर्थिक भवितव्य यासंबंधी 'दि अवेकनिंग जायंट' या मथळयाखाली डब्ल्यू. एस. वॉयूतिन्स्की या अमेरिकी अर्थशास्त्रज्ञानी चार लेख लिहिले आहेत. या लेखांच्या आधारें ही काल्पनिक मुलाखत तयार केली आहे. वॉयतिन्स्की याचा जागतिक प्रश्नांचा अनुभव फार मोठा आहे. १९१४–२० च्या महायुद्धानंतर अमेरिकेचे त्या वेळचे अध्यक्ष विल्सन यांच्या प्रेरणेनें 'राष्ट्रसंघ' अस्तित्वांत आला. त्या आंतरराष्ट्रीय संस्थेंत वॉयूतिन्स्की यानी महत्त्वाचें कार्य केलें. नंतर अमेरिकन सरकारच्या वतीनेंहि त्यांनी पुष्कळच संशोधन केलें आहे. 'जगाची लोकसंख्या आणि उत्पादन,' 'जागतिक व्यापार आणि सरकारें' हे त्यांचे ग्रंथ प्रख्यात आहेत. नुकतीच त्यानी आशियाच्या अनेक देशांना भेट दिली. भारतात बरेच दिवस राहून त्यांनी इथल्या प्रश्नाचा सूक्ष्म अभ्यास केला आणि नंतरच उपरोक्त लेखमाला लिहिली. डॉ. वॉयतिन्स्की यांची आणि पत्रकाराची काल्पनिक प्रश्नोत्तरें याच लेखमालेवर आधारलेलीं आहेत*

**पत्रकार :** तुमच्या लेखमालेचं 'जागा होत असलेला महाकाय' हें नांव वाचून मला विशेपच कुतूहल वाटलें! मी महाकाया ऐवजीं सिंह म्हटलें असतें.

**वॉयूतिन्स्की :** का ?

**प० :** कारण महात्मा गांधींच्या आधीं आमच्या राष्ट्राचे एकमेव थोर नेते

असलेले लोकमान्य टिळक यांनीं 'केसरी' नांवाचें वृत्तपत्र पाऊणशें वर्षांपूर्वी लोकजागृतीकरतां काढलें. तेव्हां त्यांच्या शिरोभागीं दिलेल्या श्लोकांत भारत हा झोपलेला वनराज आहे आणि तो केव्हां जागा होईल त्याचा नेम नाहीं, असें सुचविलें होतें. आतां स्वातंत्र्य येऊन दहा वर्षे झालीं आहेत; आणि हा सिंह चांगलाच जागा झाला आहे. जागा होऊन हळूहळू उठणाऱ्या या सिंहाचें वर्णन तुमच्यासारख्या तज्ज्ञाच्या तोंडून ऐकणे खरोखरच मनोरंजक होणार आहे.

**वॉ० :** तुमच्या या सिंहाच्या हालचालींचा अभ्यास मला अतिशय मनोरंजक वाटला यांत शंका नाहीं. माझ्या देशांत तुमच्या या महान् देशाबद्दल बरीचशी सहानुभूति आहे. त्याप्रमाणे बरेचसे गैरसमजहि आहेत. तुमच्याकडेहि अमेरिकेबद्दल तोच प्रकार आहे. गैरसमज दूर करून या दोन देशांची मैत्री दृढमूल करूं शकेन अशी खात्री इथली परिस्थिति प्रत्यक्ष पाहिल्यानंतर मला वाटत.

**प० :** तुम्ही इथे आलांत तेव्हां प्रथमदर्शनीं तुमची काय कल्पना झाली ?

**वॉ० :** खरं सांगायचं म्हणजे भारताचे किंवा आशियांतले बरेचसे नेते पुन्हा पुन्हा सांगतात त्याप्रमाणें कांहीं नवेच आर्थिक आणि राजकीय प्रयोग इथें चालले आहेत असें मला वाटत नाहीं. पाश्चिमात्यांसारखी अर्थव्यवस्था इथें आणण्याचा जोरदार प्रयत्न हे नेते करीत आहेत. त्यांच्या या नव्या विचारांचा आणि इथल्या जुन्या परंपरागत अर्थव्यवस्थेचा संघर्ष चालू आहे. पश्चिमेकडे ज्याप्रमाणें औद्योगिक क्रांति झाल्यानंतर पिळला जाणारा वर्ग आपल्याच देशांतल्या पिळवणूक करणारांविरुद्ध बंड करून उठला आणि एक नवी अर्थव्यवस्था अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न करूं लागला तसें कांहीं इथें अजून विशेष जोरानें सुरू झालें आहे असें वाटत नाहीं. जुन्या-नव्यांचा झगडा संपून औद्योगीकरण स्थिरस्थावर झालें तर मग कदाचित् असल्या प्रकारची क्रांति इथें सुरू होईल. तेव्हां युरोप-अमेरिकेंत आज भांडवलशाही औद्योगीकरणानें ज्या सुखसोयी सर्वसामान्य जनतेला मिळाल्या आणि भांडवलशाहीच्या प्रवृत्तींशीं अनेक झगडे करून, अनेक कल्याणकारी कायदे करायला लावून सामान्य जनतेनें या सुखसोयींत जी भर घातली, जीं लोकशाही स्वातंत्र्यें मिळवलीं—त्याच ध्येयाकडे जाण्याचा तुमचा देश प्रयत्न करीत आहे असें मला वाटतें.

**प० :** हा प्रयत्न कितपत यशस्वी होईल, असें तुम्हांला वाटतें ?

**वॉ० :** नेहरूंसारखे नेते, अत्यंत तल्लख बुद्धीचे असे तुमच्यांतले सुशिक्षित कार्यकर्ते आणि सर्वसामान्य जनतेचा उत्साह यामुळें हा प्रयत्न यशस्वी होईल याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाहीं. मात्र मार्ग अनेक खांचाखळग्यांनीं भरलेला, दूरचा आणि जिकिरीचा आहे.

**प० :** तो कसा काय ?

**वॉ० :** कित्येक शतकांचा झोपाळूपणा तुम्हांला झाडून टाकायचा आहे. आम्हा पाश्चिमात्यांना तुमचा भारत म्हणजे नेहेमींच एक महान् गूढ वाटत आला आहे. ग्रीक इतिहासकार हिरोडोटस्चे डोळे इथल्या सोन्याच्या झगमगाटानें दिपून गेले होते. या सोन्याच्या आशेनेंच शिकंदर इतक्या दूरवर दौड करीत आला. प्राचीन चीनच्या खानाचा दैदिप्यमान् दरबार पाहिल्यानंतरहि मार्कोपोलोनें भारताचीच एक अत्यंत वैभवशाली आणि महान देश म्हणून स्तुति केली आहे. पोर्तुगीज आणि स्पॅनिश दर्यावर्दी या सुवर्णाच्याच लोभानें पंधराव्या शतकांत भारताकडे वळले. कोलंबस इथेंच यायला निघाला होता, पण पोहोंचला आमच्या अमेरिकेला ! भारताचें हें वैभव हा एक त्या लोकांच्या कल्पनेचा खेळ होता काय? मला नाही वाटत. गेले कित्येक महिने मी या टोकापासून त्या टोकापर्यंत भारतांत फिरतों आहें. मोगल बादशहांनीं बांधलेले टोलेजंग राजवाडे आणि किल्ले पाहिले कीं, माझ्या मनांत एक विचार सारखा यायचा. सतराव्या शतकांत कलात्मकता आणि संपत्ति या दोन्ही बाबतींत भारतदेश युरोपच्या किती पुढें होता, त्याच कालखंडांत युरोपियन राजेमहाराजांनीं बांधलेले किल्ले आणि राजवाडे इथल्यांच्या मानानें किती क्षुद्र वाटतात.

**प० :** असं ?

**वॉ० :** हो. पण आणखी दोनशें वर्षें उलटलीं, आणि एकोणिसाव्या शतकांत भारत हा जगांतल्या अत्यंत दरिद्री देशांतला एक झाला. या दोनशें वर्षांत युरोपची झपाट्यानें आर्थिक प्रगति झाली, आणि हा देश जागच्या जागीं कुजत पडला. इथल्या बहुसंख्यांक जनतेचें जीवनमान पाहून आणि तिच्या दरडोई वार्षिक उत्पन्नाचा आंकडा ऐकून मला तर धक्काच बसला.

**प० :** म्हणजे ?

**वॉ० :** एकीकडे दारिद्र्याचा काळोखा महासागर आणि दुसरीकडे श्रीमंती थाटमाटाचीं लखलखणारीं बेटें पाहून मी आश्चर्यचकित झालों. तुमची

राजधानी असलेलें नवी दिल्ली शहर हें साऱ्या देशभर दिसणाऱ्या या भयानक विसंवादाचें उत्तम प्रतीक आहे—लष्करात फिरणाऱ्या निर्वासितांच्या झोपड्या आणि गोरगरिबांच्यीं शेणामातीची पडकीं घरें एकीकडे, आणि दुसरीकडे ब्रिटिशांनीं बांधलेल्या प्रचंड सरकारी इमारती आणि टोलेजंग हॉटेलें! भारतांत जिथें जिथें गेलो तिथें तिथें फाटक्या चिंध्या पांघरून अनवाणी हिंडणारे अर्धपोटी स्त्रीपुरुष कितीतरी दिसले. भिकाऱ्यांना तर या देशात तोटाच नाही. देवळाजवळ, रेल्वेस्टेशनांत, हॉटेलांच्या आसपास, बाजारांत, हमरस्त्यांवर पहावें तिथें दांडगे, धडधाकट, रोगी, आंधळे, पांगळे, तरुण, म्हातारे हवे तितके भिकारी. मला विशेष धक्का बसला तो आयाच्या किंवा सहासात वर्षांच्या चिमुरड्या बहिणींच्या कडेवर बसलेल्या दीडदोन वर्षांच्या अर्भकांनाहि आपले चिमुकले हात पसरून भीक मागायला शिकवलेलें पाहून! हे सर्व पहात असता मध्येंच एखादा राजवाडा किंवा श्रीमंताचा टोलेजंग बंगला आणि त्याच्या भोंवतालची एखाद्या परीकथेंतल्या बागेसारखी बाग दिसे!

**प०** : आहे खरा असा प्रकार.

**वॉ०** : तुमच्या अर्थव्यवस्थेचा विचार करताना नेहरूंच्या एका वाक्याची मला नेहमीं आठवण होते.

**प०** : कोणत्या वाक्याची?

**वॉ०** : नेहरू एकदां म्हणाले होते, 'आम्ही बोलतों अणुयुगाच्या गोष्टी; पण रहातों मात्र शेण-युगांत!' खरोखरच तुमच्या खेड्यातच नव्हे तर शहरातसुद्धां जळण म्हणून शेणाचा भलत्याच मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात. शेण म्हणजे निकस झालेल्या जमिनीचें अत्यंत मौल्यवान् पोषक द्रव्य होय. मोठमोठ्या रस्त्यावरून शेणाचे ढीग पाठीवर घेऊन चाललेल्या खेचरांचे तांडे किंवा शेणाच्या टोपल्या डोक्यावर घेऊन चाललेल्या बाया पाहिल्या कीं हें मोलाचें खत जळण म्हणून फुकट जाणार हें पाहून मला मनापासून खत वाटे. चांगले चांदी-सोन्याचे दागिने हातांत, पायांत, काना—नाकांत असलेल्या बाया रस्त्यांत किंवा शेतांत शेण गोळा करून नेत असलेल्या पाहून मला आणि माझ्या पत्नीला आश्चर्य वाटे. त्यांना पाहून आणखी एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली.

**प०** : ती कोणती?

**वॉ०** : भारतातल्या अगदी गरिबांकडे देखील थोडेंबहुत सोनें किंवा चांदी

असतें. शेंकडो कोटी रुपये किंमतीचें सोनें-चांदी अशा तऱ्हेनें भारतीय खेड्यांत कुजत पडली आहे. भारतांत दिसणारा आणखी एक मोठा विसंवाद म्हणजे निरक्षर असा प्रचंड बहुजन समाज आणि मूठभरच पण अतिशय तल्लख बुद्धीचा सुशिक्षिताचा वर्ग. आजच्या भारताचा राज्यकर्ता वर्ग हाच. तुम्हांला एका गोष्टीचें आश्चर्य वाटेल!

**प०** : कोणत्या?

**वॉ०** : तुमच्या मध्यवर्ति किंवा प्रादेशिक सरकारांत विद्वान आणि विचारवंत अशा लोकांचें जितकें प्रमाण आहे तितकें मोठमोठ्या सुधारलेल्या पाश्चिमात्य देशांच्या सरकारांत मुळींच नाहीं. आणखी एक चांगली गोष्ट म्हणजे, तुमच्या राज्यकर्त्या सुशिक्षितांना आपल्या ऑक्सफर्ड–केंब्रिजच्या शिक्षणाचा जितका अभिमान आहे तितकाच आपल्या देशाचाहि आहे. बहुजनसमाजाच्या प्रचंड निरक्षरतेची गोष्ट काढली कीं आमच्या देशांतला सामान्य माणूस निरक्षर असला तरी अशिक्षित नाही,–त्याचें व्यवहाराचें शिक्षण चांगलें आहे असें ही मंडळी ताबडतोब सांगतात. तें खरेंहि असेल. पण आपला देश समृद्ध करण्याचीं त्यांचीं जीं स्वप्नें आहेत त्यांच्या मार्गात ही प्रचंड निरक्षरता एक मोठी धोंड आहे यांत शंका नाहीं. नेहरूंनीं कटु शब्दांत सांगितलें तेंच खरें, — कीं शेणयुगाचा अणुयुगाशीं झगडा चालला आहे.

**प०** : हा झगडा कितपत यशस्वी होईल असें तुम्हांला वाटतें?

**वॉ०** : या लढ्याच्या अग्रभागीं असलेल्याची बुद्धिमत्ता, विशाल दृष्टि आणि कार्यक्षमता लक्षांत घेतां हा लढा यशस्वी होईल असें मला वाटतें.

**प०** : पाश्चिमात्य विचारसरणी विरुद्ध पौर्वात्य अशा संघर्षात भारताचें स्थान कुठें आहे असें तुम्हाला वाटतें?

**वॉ** : असा संघर्षच नाहीं, आणि असलाच तर भारताचें स्थान पाश्चिमात्यांच्या बाजूलाच आहे. लोकशाही राज्यपद्धतीची तुमची कल्पना ब्रिटिश आदर्शावर आधारलेली आहे. तुमचा समाजवादहि मार्क्स छापाचा नसून ब्रिटिश मजूरपक्षाच्या फेबियन छापाचा आहे. पश्चिम विरुद्ध पूर्व याचा अर्थ आम्हां युरोपियन–अमेरिकनांची विचारसरणी विरुद्ध रशियाची, असा तुम्ही करीत असाल; तरीहि तुम्ही आमच्याच बाजूचे आहांत असें मी म्हणेन. हिंसा आणि हुकूमशाहीच्या मार्गानें सामाजिक प्रगति साधण्याला तुम्ही निश्चितपणें नकार

दिला आहे. मतपरिवर्तनाच्या लोकशाही मार्गांनींच तुम्ही आपली उद्दिष्टें गांठू पहातां आहां.

**प० :** आम्हां पौर्वात्यांचा अध्यात्मावर अधिक भर असतो तर तुम्हां पाश्चिमात्यांचा भौतिकतेवर असतो हा फरक तरी तुम्ही मान्य कराल कीं नाहीं?

**बॉ० :** मुळींच करणार नाहीं. माफ करा, पण तुम्हां भारतीयांना विशिष्ट शब्दांचें भारी वेड आहे. आम्ही पाश्चिमात्यांनीं जी भौतिक प्रगति गांठली आहे तिचा उद्देश शेवटीं माणसांमाणसांत समानता निर्माण व्हावी, न्यायाचें राज्य असावें, मानवी मूल्यांचा मान राखला जावा हाच आहे. यांनाच राजकारणांतलीं किंवा अर्थशास्त्रांतलीं मानवी मूल्यें म्हणतात. भौतिक प्रगतीच्या तुमच्या योजनांचाहि उद्देश हाच आहे. या बाबतींतला माझा एक मजेदार अनुभव सांगतों. या प्रवासांत एका वृद्ध स्वामींची आणि माझी भेट झाली. इतका बुद्धिमान् माणूस मी क्वचितच पाहिला असेल. हिंदी राजकारण, अर्थकारण, समाजकारण, इत्यादि अनेक विषयांवर ते कितीतरी वेळ माझ्याशीं बोलत होते; पण 'अध्यात्म' हा शब्द त्यांनीं एकदांहि वापरला नाहीं. मात्र पाश्चिमात्य पद्धतीचा अद्यावत् बूटसूट घातलेले, आधुनिक यंत्रांनीं सुसज्ज अशा बंगल्यांत रहाणारे आणि युरोपियन पद्धतीच्या खाद्यपदार्थांवर ताव मारणारे अनेक पत्रकार आणि पुढारी माझ्याशीं बोलतांना दर पांचदहा मिनिटांनीं 'आध्यात्मिक' हा शब्द सहज खेळवतांना आढळले! आणखी एका गोष्टीचें मला आश्चर्य वाटतें.

**प० :** कोणत्या?

**बॉ० :** इंग्लंड—अमेरिकेंत शिकलेले, पाश्चिमात्य सुधारणेशीं चांगला परिचय असलेले आणि आधुनिक अर्थशास्त्राचे मुरब्बी असे हे तुमचे लोक आमच्या भौतिक थाटामाटाचाच फक्त विचार करतात आणि त्याहून महत्त्वाच्या अशा इतर गोष्टींकडे अजिबात दुर्लक्ष करतात त्याचें.

**प० :** म्हणजे?

**बॉ० :** म्हणजे असं कीं गेल्या पन्नास वर्षांत पुस्तकी भांडवलशाही आणि युरोप अमेरिकेतील आजची अर्थव्यवस्था यांत किती प्रचंड फरक झाला आहे? भांडवली किंवा स्वार्थमूल्यांवर मानवी मूल्यांनीं किती मात केली आहे? इंग्लंड-अमेरिकेतल्या मजुरांची आज किती प्रतिष्ठा आहे? अमेरिकेंतलें 'न्यू डील,' इंग्लंडचें 'वेल्फेअर स्टेट' यांच्यामुळें तिथल्या मजुराला आज जें उपलब्ध

आहे तें इथल्या श्रीमंताला तरी आहे का ? हीं मानवी मूल्यें म्हणजेच भौतिकते-पेक्षां श्रेष्ठ असें 'अध्यात्म' असेल तर आज इंग्लंड-अमेरिकेंत जे 'अध्यात्म' आहे तिथेंच पोहोंचावयाचा प्रयत्न निरनिराळ्या पंचवार्षिक योजना आंखून तुम्ही करतां आहां आणि तिथपर्यंत पोहोंचावयाला तुम्हांला अजून बराच वेळ लागणार आहे.

**प०** : तें कसं काय ?

**वॉ०** : हें पहा ! भारताचें ध्येय 'सोशालिस्ट पॅटर्न'चा समाज निर्माण करणें हें आहे. या 'पॅटर्न' प्रमाणें खासगी मालकीच्या उद्योगधंद्यांचें प्रमाण हळूहळू कमी करून सार्वजनिक मालकीच्याचें वाढवावयाचें आहे. सध्यां भारताच्या राष्ट्रीय उत्पन्नाचा फक्त ७ टक्के भाग सार्वजनिक मालकीच्या किंवा 'पब्लिक सेक्टर' मधल्या धंद्यांमध्यें गुंतविलेला आहे. अमेरिकेच्या राष्ट्रीय उत्पन्नाचा २५ टक्के भाग सार्वजनिक मालकीच्या धंद्यांत गुंतविलेला आहे. भारताच्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें 'पब्लिक सेक्टर'मध्यें दर पांच वर्षांनीं एका टक्क्यानें अधिक वाढ करण्यांत येणार आहे. म्हणजे अमेरिकेप्रमाणें २५ टक्के सार्वजनिक मालकीच्या विभागांत यावयाला भारताला नव्वद वर्षे लागतील. नव्वद वर्षांनीं भारत अमेरिकेच्या 'सोशालिस्ट पॅटर्न'च्या बरोबरीला येणार ! अमेरिकेंतले कांहीं कर्मठ राजकीय पुढारी ज्याप्रमाणें भारतांतले 'सोशालिस्ट पॅटर्न' सारखे शब्द ऐकून 'भारत कम्युनिस्ट झाला,' 'भारत कम्युनिस्ट होणार' म्हणून उगाच गवगवा करतात आणि भारताला अमेरिकेनें द्यावयाच्या आर्थिक साहाय्याच्या आड येतात, त्याचप्रमाणें भारतांतले कांहीं कांहीं लोक उगाच अमेरिकेच्या भौतिकतेचा गवगवा करतात आणि इथल्या 'अध्यात्म्याचा' उदोउदो करतात, असें मला वाटतें. विशिष्ट शब्दांचें विशिष्ट लोकांना वेड असतें असें मी म्हटलें तेंच खरें. 'सोशालिस्ट' हा शब्द ऐकल्याबरोबर कांहीं अमेरिकनांना कसेंसेंच होतें, तर कशालाहि 'अध्यात्म' म्हटलें कीं कांहीं भारतीयांना बरें वाटतें ! मात्र हेच भारतीय शिक्षण, आरोग्य, पाणीपुरवठा यांच्यावर सध्यां जादा खर्च करण्यापेक्षां पोलादाचे आणि अवजड यंत्रांचे कारखाने यांच्यावर अधिकांत अधिक खर्च केला पाहिजे, असें म्हणायला कमी करीत नाहींत ! अमेरिकेला नांवें ठेवणारे हे 'अध्यात्मवादी' आणि भारताच्या 'सोशालिझम'ला भिणारे कर्मठ अमेरिकन दोघेहि चूक आहेत असें माझें स्पष्ट मत आहे.

**प० :** थोडक्यांत म्हणजे—

**वॉ० :** थोडक्यांत म्हणजे भारतांतली परिस्थिति आमच्या अमेरिकेतल्या किंवा युरोपांतल्या परिस्थितीहून अगदीं वेगळी आहे. आम्हांला पुष्कळ वेळां ती नीटशी समजत नाही—चमत्कारिक वाटते; तरी पण आमची ज्या मानवी मूल्यांवर श्रद्धा आहे, त्यांच्यावरच भारतीयाचीहि आहे आणि आदर्श मानवी समाजाची त्यांची कल्पना आमच्याहून वेगळी नाही. ही गोष्ट आमच्या अमेरिकन लोकांनीं नीट ध्यानात घेतली पाहिजे. म्हणूनच भारताला कर्ज किंवा साहाय्य आम्ही दिलें नाहीं तर रशिया देईल या भीतीनें किंवा कर्ज न दिलें तर भारत कम्युनिस्ट होईल या भीतीनें साहाय्य देणें मला मुळींच मान्य नाही. आमचें जे ध्येय आहे तेंच भारताचें आहे म्हणून त्याच्या परिपूर्तीकरतां काय करायचें तें साहाय्य आम्ही केलें पाहिजे.

**प० :** तुमच्या अमेरिकेचे कांही मोठे मुत्सद्दी नेहरूंच्या आणि भारताच्या धोरणावर नेहमीं आग पाखडतात त्याचं काय ?

**वॉ० :** अमेरिकेतल्या तसल्या कर्मठांबद्दल मघाशींच मीं बोललों. पण आग पाखडूनहि शेवटीं साहाय्य देतातच. परराष्ट्रीय राजकारणांत भारताला कांहीं गोष्टींचें जितकें महत्त्व वाटतें तितकें आम्हांला वाटत नाहीं, आणि आम्हांला ज्यांचें फार महत्त्व वाटतें त्यांचें भारताला वाटत नाही, हें खरें आहे. पण नेहरू महात्मा गांधींचे पट्टशिष्य आहेत, आणि अहिंसा, मतपरिवर्तन आणि लोकशाही यांच्यावर त्यांची दृढ श्रद्धा आहे,—भारताला लोकशाही मार्गावरून ते ढळूं देणार नाहींत ही गोष्ट अमेरिकेनें कधींहि विसरून चालणार नाही.

**प० :** जागृत झालेल्या भारतीय सिंहाची हालचाल योग्य दिशेनें चालली आहे, असें एकंदरींत तुमचें मत दिसतें. दिशा योग्य आहे, पण भारताची आतांपर्यंतची प्रगति कशी काय आहे, आणि पुढें कशी काय होईल याची थोडीशी कल्पना देऊं शकाल का ?

**वॉ० :** राजकीय दृष्ट्या बोलायचें म्हणजे तुमचा सर्व कारभार लोकशाही पद्धतीने चालला आहे आणि तो तसाच चालवण्याचा तुमचा दृढ निश्चय आहे हें मी सांगितलेंच. आर्थिक दृष्टिकोणांतून पहायचें म्हणजे तुमच्या पंचवार्षिक योजना आणि विशेषतः समाजविकास योजना यांचा विचार केला पाहिजे.

**प० :** हा विचार केल्यानंतर तुमचें काय मत झालें ?

**वॉ० :**—हें मत विस्तारानें सांगण्यापूर्वी कोणत्याहि देशाच्या प्रगतीकडे मी कोणत्या भूमिकेवरून पहातो तें स्पष्ट केलें पाहिजे. देशाची प्रगति म्हणजे त्या देशाचें लष्करी बळ काय आहे आणि त्यांत प्रचंड कारखाने किती आहेत हें मी पहात नाही. देशातल्या सर्वसामान्य माणसाचें जीवनमान किती उच्च दर्जाचें आहे तें मी पहातो. त्याला भरपूर अन्नवस्त्र मिळालें आहे, तो स्वतंत्रपणें आनंदानें जगतो आहे आणि त्याच्या भौतिक गरजांचे हे भाग आहेत असें नव्हे तर मानव म्हणून त्याच्या,–तुम्ही म्हणतां त्या आध्यात्मिक किंवा सांस्कृतिक गरजाहि संपूर्ण होताहेत, या गोष्टी पाहून देशाच्या प्रगतीचें मी मोजमाप करूं पहातो.

**प० :** पण या बाबतींत तुमच्याशीं कुणाचा मतभेद असेल असें मला वाटत नाहीं.

**वॉ० :** वा! मतभेद नाहीं कसा? कम्युनिस्ट देशाच्या प्रगतीचीं स्तुतिस्तोत्रें गाणारे लोक या असल्या 'प्रचंड' पणाचींच गाणीं गात असतात. मात्र या मताचे लोक दोन्ही टोकांना आहेत—डाव्या तशाच उजव्या!

**प० :** तें कसें काय?

**वॉ० :** चीन, रशियाचीं स्तुतिस्तोत्रें गाणारे तुमच्या देशांतले काय किंवा इतर देशांतले काय–तीं कोणत्या प्रकारें गातात हें तुम्हाला माहीत असेलच. उजव्या टोकाचे, म्हणजे आमच्या अमेरिकेंतल्या बड्या भांडवलदारांसारखे लोकहि अमेरिकेचा थोरपणा सांगतांना पोलादाच्या, कोळशाच्या आणि पेट्रोलच्या उत्पादनाचे आंकडे सांगत असतात!

**प० :** या बाजूकडे लक्ष देऊं नये,–जनतेच्या नित्योपयोगी वस्तूंच्या उत्पादनावरच सर्व लक्ष केंद्रित करावें असें तुमचें म्हणणें आहे कीं काय?

**वॉ० :** असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. अंतर्गत सुव्यवस्थेकरतां किंवा परचक्र-निवारणाकरतां माणूस अजूनहि बराचसा सुधारेपर्यंत ज्याप्रमाणें पोलीस, सैन्य, शस्त्रास्त्रें पाहिजेत त्याप्रमाणेंच पोलाद, कोळसा, पेट्रोल या गोष्टी जगांत युद्धें आहेत तोंपर्यंतच नव्हे तर पुढेंहि लागतीलच. पण आज त्यांच्या उत्पादनाकडे ज्या दृष्टीनें पाहिलें जात आहे ती दृष्टि मला मुळींच पसंत नाहीं. देशांतल्या सर्व-सामान्य माणसांची उपासमार करून, त्याची मुस्कटदाबी करून भरपूर पोलाद आणि भरमसाट यंत्रसामुग्री निर्माण करणारा देश मोठा कां?—तर त्याचें राज्य

कर्ते सर्व जगाला भारी होऊन बसतात, त्यांच्यापुढें त्यांचे आणि इतर देशांतले लोक चळचळा कांपतात, आणि तो देश युद्धांत कुणालाहि जिंकूं शकतो ! तुमच्या देशांत फिरतांना असे किती तरी विद्वान् मला भेटले;—देशभर पसरत चाललेल्या तुमच्या समाजविकासयोजनांबद्दल बोलतांना जरा नाक मुरडूनच ते बोलत, पण पोलादाच्या किंवा अवजड यंत्रांच्या कारखान्यांसंबंधीं बोलूं लागले कीं त्यांना स्फुरण येई. त्याच्या सद्‌हेतूंबद्दल मला मुळींच शंका नाहीं. पण औद्योगीकरणाच्या अंतिम हेतूचा विसर पडतां कामा नये.

**प०** : म्हणजे काय ?

**बॉ०** : जगांत औद्योगीकरण आलें तें माणसांच्या सुखाकरता; कोणत्याहि देशानें बलाढ्य म्हणून मिरवण्याकरितां नव्हे. ज्यांच्या सर्वसामान्य जनतेच्या रहाणीचें मान अतिशय उच्च आहे असे जगांतले कितीतरी देश,—कॅनडा, आस्ट्रेलिया न्यूझीलंड, डेन्मार्क, नॉर्वे, फिन्लंड, स्वित्झर्लंड,—पोलाद किंवा अवजड यंत्रसामुग्री आपल्या देशांत तयार करण्याच्या भानगडींत न पडतां इतर देशांतून आयात करीत असतात. तुमच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या प्रतिज्ञापत्रकांत आणि पंडित नेहरूंच्या कांहीं भाषणांत अवजड यंत्रांची निर्मिती हाच औद्योगीकरणाचा पाया होय असें ठांसून सांगितलेलें आढळलें. म्हणून या मुद्यांची चर्चा मी थोड्या विस्तारानें केली. गेल्या शें दोनशें वर्षांत इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, फ्रान्स वगैरे देशांचें जें औद्योगीककरण झालें त्याचा प्रारंभ नित्योपयोगी वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या यंत्रांनींच झाला; आणि मग त्यांचा विकास होतांहोतां जड यंत्रें करण्यांत येऊं लागली. रशिया आणि जपानच्या औद्योगीकरणांचा इतिहास मात्र वेगळा आहे. जपानच्या मेजी राजवटींत किंवा रशियांत पीटर दि ग्रेटच्या कारकीर्दीत औद्योगीकरणाचा चंग बांधला तत्कालीन राज्यकर्त्यांनीं; आणि त्यांचा हेतु जनताकल्याणापेक्षां लष्करी सामर्थ्याची वाढ आणि साम्राज्यांचा विस्तार हा असल्यामुळें अवजड यंत्रांच्या निर्मितीला त्यांनीं आधीं हात घातला. तुमच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या किंवा पंडित नेहरूंच्या भाषणांच्या सद्‌हेतूंबद्दल मला मुळींच शंका नाहीं. अर्थशास्त्रीय सिद्धांतांबद्दलच्या चुकीच्या कल्पनांमुळें त्यांनीं अशीं विधानें केलीं असें मला वाटतें.

**प०** : कां ?

**बॉ०** : कारण दुसऱ्या पंचवार्षिक योजनेचा जो सुधारलेला मसुदा पुढें

आला आहे त्याची सूक्ष्म छाननी केली असतां असें दिसून येतें कीं तत्त्वचर्चेंत भोळ्या भावानें जड औद्योगीकरणावर भर दिलेला असला तरी प्रत्यक्षांत औद्योगीकरणाच्या सदराखालीं ज्या गोष्टी दिल्या आहेत त्यांना शहरी औद्योगीकरण म्हणण्यापेक्षां खेड्यांची सुधारणा हें नांव देणेंच अधिक योग्य होईल. त्यामुळें प्रत्यक्ष योजनेंत औद्योगीकरणाइतकेंच खेड्यांच्या विकासाला महत्त्व आलें आहे.

**प०** : म्हणजे?

**वॉ०** : म्हणजे असें पहा, पहिल्या पंचवार्षिक योजनेंत सर्व भर शेतीवर दिला होता, दुसरींत औद्योगीकरणावर दिला आहे; आणि वरवर पहातां शेतीच्या तिप्पट औद्योगीकरणावर खर्च होणार असें दिसतें. पण औद्योगीकरण या सदरांत ग्रामीण उद्योग, खेड्यापाड्यांसाठीं विजेची सोय, खेड्यांना जोडणारे रस्ते, वहातूक इत्यादि गोष्टी घातल्या आहेत. म्हणूनच मी म्हटलें कीं औद्योगीकरणाइतकेच खेड्यांच्या विकासाला या योजनेंत महत्त्व आहे. ही गोष्ट चांगली आहे. तुमचे नेते कांहीं बोलत असले तरी प्रत्यक्षांत त्यांना भलतेंच औद्योगीकरण नको आहे. या दृष्टीनें तुमचे समाजविकासप्रकल्प मला फार महत्त्वाचे वाटतात.

**प०** : पण त्यांना आमचे कांहीं चांगले चांगले अर्थशास्त्रज्ञ नाकें मुरडतात असें तुम्हीं मघांशीं म्हणालात ना!

**वॉ०** : हो, नाक मुरडतात हें खरें आहे. या प्रकल्पांत कांहीं दोष असतील आणि कांहीं ठिकाणीं त्यांना यावें तितकें यशहि आलें नसेल, पण त्यांच्यामागली कल्पना अतिशय महत्त्वाची आहे.

**प०** : कोणती ती कल्पना?

**वॉ०** : या प्रकल्पानीं देशाचें आर्थिक किंवा भौतिक हित कितपत साधलें गेलें आहे यापेक्षांहि त्यांच्यामुळें झोपलेला सिंह जागा होऊं लागला आहे ही गोष्ट मला महत्त्वाची वाटते.

**प०** : तें कसें काय?

**वॉ०** : तसे पाहिलें तर पहिल्या पंचवार्षिक योजनेंत एकंदर २,५०० कोटि रुपये खर्चांत या समाजविकास योजनांसाठीं फक्त १०० कोटीच ठेवले होते; आणि ५,००० कोटींच्या दुसऱ्या योजनेंत जवळ जवळ २०० कोटीच आहेत.

म्हणजे योजनाच्या एकंदर खर्चापैकीं फक्त ४ टक्केच समाजविकासासाठीं खर्च होणार. पण या टक्केवारीला मी महत्त्व देत नाहीं. महत्त्वाची गोष्ट १९५५-५६ सालापर्यंत सत्तर हजार (७०,०००) खेड्यांना व्यापून टाकणारे सातशें (७००) समाजविकास प्रकल्प झाले आहेत. म्हणजे पांच कोटी खेडूत ५० टक्के सरकारी साहाय्य घेऊन आणि ५० टक्के स्वावलंबन करून नवे रस्ते, नवीं घरें, नवे तलाव, नव्या शाळा बांधीत आहेत; नव्या नव्या खतांचे प्रयोग करून धान्याचें उत्पादन वाढवीत आहेत; गुराची पैदास सुधारीत आहेत, दवाखाने उघडीत आहेत. समाजविकास प्रकल्पां (कम्यूनिटी डेव्हलपमेंट प्रोजेक्ट) प्रमाणेंच राष्ट्रीय विस्तार (नॅशनल एक्स्टेन्शन) योजनांचें जाळेंहि देशभर पसरलें जात आहे. १९५६ सालापर्यंत ७०० विकासप्रकल्पांच्या जोडीला ५०० विस्तारयोजना अस्तित्वांत आल्या, म्हणजे आणखी ३ कोटी खेडूत नव्या कामाला लागले. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेनुसार १९६१ पर्यंत भारताच्या एकंदर ग्रामीण जनतेपैकीं ४० टक्के लोक विकासयोजनांत आणि उरलेले ६० टक्के विस्तारयोजनांत समाविष्ट होतील. म्हणजेच १,८०० विकासप्रकल्प आणि ३,००० विस्तारयोजना पुऱ्या होतील. भारताची सारी खेडूत जनता आत्मोद्धाराच्या कामाला लागलेली असेल, सिंह खडबडून जागा झालेला दिसेल, या गोष्टींचें मला विशेष महत्त्व वाटतें याला आणखी एक कारण आहे.

**प०** : तें कोणतें ?

**डॉ०** : खेड्यापाड्यांतल्या कोट्यवधि जनतेची ही जागृति—सामुदायिक कामें करण्याची ही प्रवृत्ति लोकशाहीच्या विकासाला पोषक आहेच, पण भारताचा आणखीहि एक फायदा यात आहे. पैसा नसला तरी भारताजवळ मनुष्यबळ भरपूर आहे. त्याचा जास्तीत जास्त उपयोग देशाच्या उत्कर्षाकरतां केला पाहिजे. शतकानुशतकें हें बळ अज्ञानात आणि पिळवणुकींत खितपत पडलें होतें. आतां त्याचा उपयोग होऊं लागला आहे. मात्र एका गोष्टीचें मला फार वाईट वाटतें.

**प०** : कोणत्या ?

**डॉ०** : दवाखाने, शाळा, रस्ते, अन्न, वस्त्र यांच्याबरोबरच प्राथमिक शिक्षणाचा,—निदान साक्षरतेचा तितक्याच झपाट्यानें प्रसार व्हावयाला पाहिजे. नव्या लोकशाही समाजाचा नागरिक साक्षर, शिक्षित नसेल तर लोकशाहीलाच नव्हे तर भौतिक प्रगतीलाहि तें त्रासदायक होणार. योजनेच्या वर्षात (७०,०००)

सत्तर हजार खेड्यासाठीं साधारणपणें पस्तीसशे ( ३५०० ) प्राथमिक व मूलोद्योग शाळा उघडण्याचें नमूद आहे. म्हणजे २० खेड्याना एक शाळा असें प्रमाण झालें. भारताच्या घटनेनें ६ ते १४ वर्षाच्या सर्व मुलांमुलींना १९६० पर्यंत सक्तीचें प्राथमिक शिक्षण देण्याचें वचन दिलें आहे. दोन्ही पंचवार्षिक योजना पाहिल्या तर दहा वर्षात ११ ते १४ वर्षे वयाच्या मुलामुलींच्या प्राथमिक शिक्षणाची वाढ पूर्वीपेक्षा ५ टक्क्यानीं होणार. या गतीनें शिक्षणाचा प्रसार झाला तर घटनेप्रमाणें करावयाच्या सर्व मुलामुलींच्या सक्तीच्या शिक्षणाची सोय व्हावयाला दीडशें वर्षे लागतील ! छे, छे, यंत्र, कारखाने, धान्योत्पादन याच्या इतकेंच याहि गोष्टींकडे तुमच्या नेत्यांनी लक्ष द्यावयाला पाहिजे. शेवटी सर्व योजना आणि सर्व प्रगति यांचा मध्यबिंदु माणूस आहे हें विसरता कामा नये. माणूस आहे तर सर्व आहे; नाही तर तुमचें पोलाद, लोखंड, सिमेंट, यंत्र, कारखाने सर्व फुकट आहेत.

**पु०** : म्हणजे ?

**डॉ०** : म्हणजे असें पहा—जपान आणि जर्मनी,—दोन्ही देश दुसऱ्या महायुद्धापूर्वी औद्योगिक दृष्ट्या अत्यंत पुढारलेले होते. ज्या अवजड यंत्रसामुग्रीची निर्मिती म्हणजे एखाद्या राष्ट्राचा फार थोरपणा असें कांही लोक समजतात ती सामुग्री निर्माण करणारे गडगज कारखाने या दोन देशात होते. शंपन्नास वर्षाच्या दीर्घोद्योगानें त्यांनीं उभे केलेले हे कारखाने, विद्युत्केंद्रं, त्यांचीं मोठमोठीं शहरें, रेल्वे, पूल या सर्वाची गेल्या युद्धात राखरांगोळी झाली. पण जपानची आणि जर्मनीची माणसें शिल्लक होतीं. तीं अर्धपोटी होतीं. तीं अर्धनग्न होतीं. पण कित्येक वर्षाच्या शिक्षणामुळें आणि शिस्तीमुळें त्यांची निर्मितिशीलता आणि सामुदायिक कामे करण्याची हिंमत जशीच्या तशी होती. त्यामुळें युद्ध संपून दहा वर्षे लोटली नाहीत तोंच ही दोन्ही राष्ट्रें नुसतीं पूर्ववैभव मिळवूनच थांबलीं नाहींत, तर कांहीं बाबतींत पुढें गेली ! राष्ट्रांचें थोरपण पोलादांच्या कारखान्यांत आणि सैनिकी सामर्थ्यांत मुळींच नाही,—तें तिथल्या माणसाच्या कसदारपणांत आहे. म्हणून मी म्हणतो, सर्व प्रगतीचा मध्यबिंदु माणूस !

**पु०** : मी आपला अतिशय आभारी आहें.

—वाङ्मयशोभा, ऑगस्ट १९५८

# कोयनेचें पाणी



कांहीं वर्षांपूर्वी वेळगांवहून मुंबईला विमानानें येत होतो. फक्त दीड तासाचा प्रवास; पण पश्चिम महाराष्ट्राच्या नद्या आणि डोंगर संध्याकाळीं चार पांचच्या झळझळत्या सोनेरी उन्हांत एखाद्या ठशाच्या नकाशांत उठवल्यासारख्या एकदम पाह्यला मिळाल्या. तेव्हांच कृष्णाकोयनेचा संगम आकाशांतून पाह्यला मिळाला. महाबळेश्वराच्या पठारावर उगम पावलेली कोयना दक्षिणेकडे वहात येऊन एकदम पूर्वेकडे वळून कृष्णेला मिळालेली दिसत होती. पुढें कृष्णेच्या पाण्यांतून ती भारताच्या पूर्वेला असलेल्या समुद्राला मिळते. तेव्हापासून पूर्वेकडे वळलेल्या कोयनेचें चित्र माझ्या मनांत ठसलें होतें.

पुढें महाराष्ट्राला वीज आणि पाण्याचा भरपूर पुरवठा करून समृद्ध करूं पहाणाऱ्या कोयना योजनेचें वृत्त वर्तमानपत्रांतले नकाशे आणि चित्रें पहात वाचूं लागलो. तेव्हां एका गोष्टीची मला मोठी गंमत वाटली. माणूस निसर्गाला आपल्या सेवेसाठीं राबवतांना भूगोल किती बदलून टाकतो! समुद्र आणि नद्या लाखों, करोडो वर्षें या पृथ्वीवर आहेत तिथें असतील. सह्याद्रि पर्वतांत उगम पावलेल्या कांहीं नद्या पश्चिमेकडे वहात गेली लाखोकरोडो वर्षें पश्चिमेकडल्या अरबी समुद्राला जाऊन मिळत आहेत, तर कांहीं पूर्वेकडे वहात पूर्व समुद्राला मिळत आहेत. कोयनेचें पाणी कृष्णेंतून इतकीं वर्षें पूर्वसमुद्राला जाऊन मिळतें आहे. आतां इतक्या वर्षांनीं उत्तरेकडून दक्षिणेकडे येणारी कोयना ज्या हेळवाक गांवाजवळ कृष्णेला मिळण्याकरतां एकदम पूर्वेकडे वळते तिथेंच एक धरण बांधून माणूस कोयनेला अडवून धरणार आहे; आणि घाटाच्या पश्चिमेला

कोंकणांतल्या चिपळूण जवळ चौदाशें फूट तिचें पाणी एकदम खालीं आणून शेती, वीजनिर्मितीसाठीं वापरून पश्चिमसमुद्राकडे सोडून देणार आहे ! समुद्राला नद्यांचा पति म्हटलें आहे. बिचाऱ्या पश्चिम समुद्राला कल्पनाहि नसेल कीं क्रोडों वर्षांनंतर आतां लवकरच त्याला एक नवी पत्नी मिळणार आहे !

कोयनेचा परिसर आतांपर्यंत मी तीनदां पाह्यला. पहिल्यांदा आकाशांतून घेतलेलें विहंगमदर्शन. विमानांतून दिसलेलें तें दृश्य म्हणजे महाराष्ट्रांतल्या नद्या, डोंगर, दऱ्याखोऱ्यांचा रंगीबेरंगी, जिवंत झालेला ठशाचा प्रचंड नकाशाच होता. कोयना योजनेची आंखणी झाल्यानंतर धरणाची जागा आहे तरी कुठें ती पाहावी, म्हणून चिपळूणला गेलों असतां घाट चढून हेळवाकजवळ नदीचें वळण पाह्यला सहज गेलों. नदीचें पाणी त्या जागीं शांत, स्तब्ध दिसत होतें. आजूबाजूला हिरवी डोंगरमाया आणि मधूनच चिवचिवाट करीत उडणारे कांहीं पक्षी. धरणाचीं दोन टोकें दाखवण्याकरतां नदीच्या या कांठावर एक आणि पलीकडल्या एक—असे सिमेंटचे दोन छोटेसे बुरूज दिसत होते. बरोबर आणलेला फराळ नदीकांठच्या एका झाडाखालीं बसून खाणारे आम्ही दोघेतिघे मित्र आणि क्वचित् कुठें पाठीवर घोंगडी टाकून रानांतल्या पायवाटेनें जाणारा एखादा-दुसरा धनगर किंवा शेतकरी याखेरीज त्या परिसरांत फारसें कुणीच त्यावेळीं दिसलें नाहीं.

पण धरणाचें काम सुरू झाल्यावर तिसऱ्यांदा हेळवाकला आणि घाटाच्या खालीं पोफळीजवळ गेलों, तेव्हां यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें त्या शांत, नीरव परिसराचें पश्चिम सागराशीं कोयना नदीचें लग्न लावायला आलेल्या हजारों वऱ्हाडयांनीं गजबजलेल्या गांवांत रूपान्तर झालेलें दिसत होतें. हेळवाक-जवळ,—पोफळीजवळ सातआठ हजार कामगारांचीं गांवें वसली होतीं. नदीच्या बाजूला, डोंगराच्या कुशींत पत्र्याचीं घरें, इंजिनिअरांचे बंगले, कारखान्यांचीं छपरें, आडवेतिडवे, छोटेमोठे रस्ते वरखालीं गेलेले दिसत होते. यांत्या-लॉऱ्यांच्या वर्दळीचा धुमाकूळ चालला होता. घणांचे आवाज, सुरुंगांचे स्फोट ऐकूं येत होते. पांढऱ्या रंगाच्या पत्र्याचीं शिरस्त्राणें घालून शेंकडो कामगार, इंजिनियर, कामें करीत इकडून तिकडे फिरत होते.

एका इंजिनियर मित्रानें आपल्या ऑफिसांत नेऊन कोयना योजनेचें काचेच्या पेटींत ठेवलेलें छोटें 'मॉडेल' आम्हाला दाखविलें. तो म्हणाला, "सह्याद्रींत

उगम पावलेल्या बहुतेक नद्या पूर्वेकडे किंवा नैऋत्येकडे वहात जातात. पण कोयना मात्र दक्षिणेकडे वहात जाते. त्यामुळें तिच्या खोल पाण्यात बरेच मैलपर्यंत पावसाचें पाणी साठत जातें. कोयनेच्या पात्रांत येणारें दोनशे इंचांपर्यंतचें हें पावसाचें पाणी वाहून जाऊं न देतां बांध घालून अडविण्यात येणार आहे."

"सबंध कोयना अशा तऱ्हेनं अडवल्यामुळं एक प्रचंड तळें निर्माण होईल, नाही का ?" आम्ही म्हणालों.

"होय ना. हा पाणलोट अडवून धरणारा प्रदेश महाबळेश्वराच्या आसपास चांगला तीनशे साडेतीनशे चौरस मैलाचा असेल. महाराष्ट्रांत हा एक नवीनच निसर्गरमणीय अफाट तलाव होईल."

"या तलावांतलें पाणी तुम्ही घाटाखाली पोफळीकडे आणून वीज तयार करणार ?"

"होय. हें पहा, हेळवाक पासून तीन मैलांवर हें देशमुखवाडी खेडें आहे, तिथें मुख्य बंधारा होईल. तो या काठापासून त्या काठापर्यंत बावीसशे फूट लांब आणि दोनशे सत्तर फूट उंच होईल. इथे नदीचें पात्र समुद्रसपाटीपासून एकोणीसशे फूट उंचीवर आहे. पलीकडे घाटाखाली पोफळीगांव पांचशें फूट उंचीवर आहे. तिथें हे पाणी बोगद्यांतून आम्ही खाली सोडणार. म्हणजे चौदाशें फूट खाली पडून त्या शक्तीवर पोफळीच्या पॉवर हाऊसमधलीं आमचीं टर्बाइन्स फिरतील आणि वीज निर्माण होईल. हें पॉवर हाऊस पोफळीजवळ डोंगराच्या पोटांत गुहा खोदून तिथें बांधलें जात आहे. काल ट्रॉलीत बसवून तिथं नेलं होतं मी तुम्हाला ?"

"होय. पण तें डोंगराच्या पोटात का ठेवतां आहां तुम्ही ?"

"डोंगराच्या खडकात तें सुरक्षित राहील. त्याशिवाय पोलादाची बचत होईल, मधूनमधून कडेकपारी कोसळून उघड्यावरल्या इमारतींना धोका उत्पन्न होतो तो रहाणार नाही वगैरे वगैरे कारणें आहेत. देशमुखवाडीपासून म्हणजे मुख्य बंधाऱ्याकडून पांच मैलावर कोयनेला मिळणाऱ्या नावजी नाल्याच्या खोऱ्यांत आम्ही एक 'इनटेक चॅनेल' तयार करतों आहोत. या चॅनेलच्या शेवटाशीं एक टॉवर आणि कंट्रोलवर्क्स रहातील. इथून सबंध घाट पोखरून 'हडेरेस' भेगदा होईल. 'इनटेक' मधून त्याच्यांत पाणी सोडलें जाईल, आणि मग तें सह्याद्रीच्या पोटांतून एकदम चौदाशें फूट खाली कोकणांत पोफळीच्या

पावरहाऊसकडे जाईल. तिथलीं टर्बाइन्स फिरवून आणि वीज निर्माण करून तें दुसऱ्या एका ‘टेलरेस’ बोगद्यांत जाईल. तिथून मग तें एखाद्या नैसर्गिक प्रवाहांत सोडून देण्यांत येईल.”

“म्हणजे घाटावरून एकदां कोयनेचं पाणी तुमच्या ‘हेडरेस’ बोगद्यांत शिरलें कीं खाली कोंकणातल्या पॉवर हाऊस करून निघणाऱ्या ‘टेलरेस’ बोगद्यांतून बाहेर पडेपर्यंत ते आमच्या दृष्टीला पडणार नाहीं, अं?”

“बरोबर आहे.”

“काय हो, ही कोयनेचं पाणी अडविण्याची कल्पना पहिल्यांदा कधीं आली?” आम्ही विचारलें. “इंजिनियरांना केव्हांपासून ही कल्पना होती; पण १९४७ साली मुंबई सरकारनं ही कल्पना प्रत्यक्षात आणायचं मनावर घेतलं, आणि मग नाना प्रकारची पूर्वतयारी होतां होतां १९५४ च्या जानेवारी महिन्यांत योजनेचं काम सुरू झालं,” ते म्हणाले.

“अस्सं?—सगळं काम पुरं केव्हां व्हायचं?”

“तीन टप्प्यांत सर्व काम पुरं व्हावं अशी योजना आहे. पहिला टप्पा १९६०–६१ सालापर्यंत पुरा होईल. एकंदर पाच लक्ष किलोवॅट वीज कोयनेपासून निर्माण व्हायची आहे. त्यापैकीं जवळजवळ दोन लक्ष चाळीस हजार किलोवॅट हा टप्पा १९६०–६१ साली पुरा झाल्यानंतर मिळूं लागेल. ठरलेल्या वेळेच्या आधींच हा टप्पा पुरा करण्याची आमची महत्त्वाकांक्षा आहे. या सालापासून मुंबईला आणि सातारा, कोल्हापूर, पुणं आणि सोलापूर या जिल्ह्यांना वीज मिळूं लागेल. या विभागातल्या कापड गिरण्या, साखर कारखाने, इंजिनियरिंग उद्योग, वगैरेंच्या विकासाकरितां विजेची मागणी केव्हांपासून आहे.”

“दुसऱ्या टप्प्यांत काय होईल?”

“हे पहा, एकंदर धरण नदीच्या पात्राखाली ५८ फूट आणि वर २७० फूट इतकं व्हायचं आहे. पहिल्या टप्प्यांत तें वर २०७ फूटच तयार होईल. त्यामुळें पाण्याचा सांठा कमी असेल. दुसऱ्या टप्प्यांत धरणाची उंची आणखी ६३ फुटांनीं वाढवून २७० पर्यंत नेण्यांत येईल. म्हणजे पाण्याचा साठा आणखी किती तरी वाढेल. त्यामुळें मुख्य पॉवर हाऊसमध्यें आणखी एक लक्ष सत्तर हजार किलोवॅट वीज निर्माण करतां येईल. हा वाढलेला विजेचा पुरवठा ग्रामीण भागांत ‘लिफ्ट इरिगेशन’साठीं विशेषेंकरून देण्यांत येईल. त्या शिवाय कित्येक कोटी

घनफूट पाणी कोयना नदीच्या दोन्ही कांठावरच्या प्रदेशांना आणि कृष्णेच्या उजव्या कांठाला वारणा नदीपर्यंत पाटबंधारे बांधून शेतीच्या विकासासाठीं वापरतां येईल."

"आणि तिसरा टप्पा?"

"तिसरा टप्पा पुरा होईल तेव्हां खालीं कोंकणांत 'टेल रेस' बोगद्यांतून बाहेर पडणाऱ्या पाण्यावर एक पॉवर हाऊस चालवलें जाईल; आणि शेतीचे दिवस नसतील तेव्हां पाटबंधाऱ्यांसाठीं दिलेल्या पाण्यावर वरती घाटावर आणखी एक पॉवर हाऊस चालेल. पहिल्यांतून साठ हजार आणि दुसऱ्यांतून तीस हजार किलोवॅट वीज आम्ही देऊं शकूं. तुमच्या मुंबईतल्या आणि आसपासच्या उद्योग-धंद्यांना मिळेल तितकी वीज हवीच आहे!"

आसपास तारांवरून सरसरणाऱ्या, डोंगरांतल्या खडकांतून खडखडणाऱ्या, पत्र्यांच्या छपरांखाली धडधडणाऱ्या एकाहून एक अजस्र, राक्षसी यंत्रांचे अवाढव्य कारभार, आणि त्यांना आवरणारे तरबेज कामगार पहात पहात आमच्या इंजिनियर—मित्राचे आभार मानून आम्ही परत फिरलो.

लोकमित्र, ३०-८-५९